

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जुलै–सप्टेंबर एकोणिसशे सत्त्याहत्तर
संपादक : डॉ. हेमंत विष्णु इनामदार

सर्वोत्कृष्ट मुद्रणाबद्दल केंद्र सरकारने साहित्य परिषदेला दिलेल्या ताम्रपत्राचे छायाचित्र

भारत सरकार

सूचना और प्रसारण मंत्रालय

छपाई और सजावट पर राजपुरस्कार

प्रथम पुरस्कार

1975 - 76

[illegible] और [illegible]

'महाराष्ट्र [illegible] (मराठी)' [illegible]

महाराष्ट्र [illegible], पुणे [illegible]

अनुक्रमणिका

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन

बावन्नावे अधिवेशन, पुणे



नियोजित अध्यक्ष

श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे

अनुक्रमणिका

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

आषाढ-श्रावण-भाद्रपद, शके १८९९
जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर, इ. स. १९७७
प्रसिद्धी दिनांक ३० सप्टेंबर १९७७
अंक क्रमांक २०२ मूल्य पाच रुपये



**मुद्रक**
श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

**प्रकाशक**
श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे ३०

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



■

मुखपृष्ठ : मुद्रण-श्रेष्ठतेच्या नियतकालिक विभागीय स्पर्धेत महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या श्रीज्ञानेश्वर विशेषांकास श्रेष्ठतासन्मान म्हणून मिळालेला ताम्रपट.

# संपादकीय

## १. वाङ्मयीन नियतकालिकांचा परामर्श

अंक २०० व २०१ असा साहित्य पत्रिकेचा जोड अंक जून १९७७ मध्ये खास स्वरूपात प्रसिद्ध झाला. मराठीतील सतरा विद्यमान वाङ्मयीन नियतकालिकांच्या कामगिरीचे समालोचन करणारे लेख त्या अंकात घेतले होते. आता प्रस्तुत अंकात आठ अस्तंगत वाङ्मयीन नियतकालिकांचा परिचय करुन दिला आहे. याशिवाय साहित्य पत्रिकेच्या आजवरच्या एकंदर पंधरा संपादकांच्या कार्याचा परामर्श घेणारे लेख दप्तरी दाखल आहेतच. पत्रिकेविषयीचे हे पंधरा लेख आणि उर्वरित महत्त्वपूर्ण नियतकालिकांविषयीचे लेख हे सर्व साहित्य यापुढील एकेका अंकातून सवडी-सवडीने प्रसिद्ध होईल. पत्रिकेच्या वार्षिक / आजीव सदस्यत्वाच्या वर्गणीचे दर व जमाखर्चाचे एकूण अंदाजपत्रक यांच्या काही मर्यादा आहेत. त्यामुळे यापुढील अंक मर्यादित पृष्ठसंख्येत बसवावे लागणार आहेत. संपादकीय, साहित्यमीमांसा, साहित्यसमीक्षा, साहित्यसंशोधन, ग्रंथपरीक्षण, प्रसंगोचित विषय आणि परिषद्-वार्ता ही सर्व सदरे पत्रिकेस महत्त्वाची वाटतात; पण त्यांचा प्रपंच दाटीवाटीने थाटावा लागणार आहे. मुखपृष्ठ, विशेष वाङ्मयीन सन्मान प्राप्त व्यक्तीचे छायाचित्र, दुर्मिळ हस्तलिखितांचे व अन्य महत्त्वाच्या साहित्याचे ब्लॉक्स या सर्वांची कलात्मक मांडणी परवडेल तेवढीच करावी लागणार आहे. समीक्षा आणि संशोधन यांना वाहिलेल्या सर्वच नियतकालिकांची ही सद्यःस्थिती आहे. लेखकांनी व वाचकांनी आमची ही अडचण समजून घ्यावी व सहकार्य करावे अशी नम्र विनंती आहे.

## २. पत्रिकेच्या विशेषांकाचा गौरव

संत ज्ञानेश्वरांच्या सप्तम जन्मशताब्दीच्या निमित्ताने महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा क्र. १९३–१९४ हा जोड अंक ऑक्टोबर १९७५ मध्ये 'श्रीज्ञानेश्वर विशेषांक' म्हणून प्रसिद्ध झाला. देखणे बाह्यांग व संपन्न अंतरंग ही या अंकाची वैशिष्ट्ये. या अंकाच्या तांबुस-गुलाबी मुखपृष्ठावर ज्ञानेश्वरीच्या एका हस्तलिखितातील काही ओव्यांचा ब्लॉक छापलेला आहे. समग्र अंकास पोथीचा सुरेख घाट आहे. मुद्रण प्रसन्न-रमणीय आहे. ज्ञानयोग, 'गीतारत्नप्रासाद', धर्मसाधना, रसविचार, पाठ-

अनुक्रमणिका

चर्चा, पंथराज असे ज्ञानेश्वरीविषयक अठरा व्यासंगपूर्ण लेख अंकात आहेत. ज्ञानेश्वर-विषयक सर्व विशेषांकांत पत्रिकेचा प्रस्तुत खास अंक म्हणजे केवळ अनन्वय अलंकार आहे. मुद्रण व मांडणी यांतील वैशिष्ट्यांबद्दल केंद्रीय शासनाने या अंकास प्रथम पुरस्कार दिला आहे. शासनाकडून परिषदेस मिळालेल्या ताम्रपटाचे छायाचित्र या अंकाच्या मुखपृष्ठावर दिले आहे.

पत्रिकेच्या श्रीज्ञानेश्वर विशेषांकाचे मुद्रक **श्री. चिं. स. लाटकर**, प्रकाशक **श्री. रा. ज. देशमुख**, संपादक **डॉ. भा. दि. फडके** व संपादन-समितीचे अन्य सदस्य या सर्वांना हे सुयश भूषणावह आहे. आम्ही त्यांचे मनापासून अभिनंदन करतो.

## ३. बावन्नावे साहित्यसंमेलन

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे बावन्नावे अधिवेशन पुण्यास महर्षी कर्वे मार्गावरील, 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी'च्या 'आबासाहेब गरवारे महा-विद्यालया'च्या प्रांगणात १८, १९ व २० नोव्हेंबर १९७७ या तीन दिवशी भरणार आहे. १९४९ मध्ये आचार्य शं. द. जावडेकरांच्या अध्यक्षतेखाली बत्तिसावे साहित्य संमेलन पुण्यास 'सर परशुरामभाऊ महाविद्यालया'च्या मैदानावर भरले होते. त्यानंतर अठ्ठावीस वर्षांनी संमेलन–समारोहाचा हा सुयोग पुणेकरांना लाभत आहे. यंदाच्या संमेलनाप्रमाणेच एकुणपन्नास सालच्या संमेलनाचेही यजमानपद 'पुणे नगर वाचन मंदिर' या संस्थेकडेच होते, हा योग सुखद आहे.

लोकहितवादींनी सव्वाशे वर्षांपूर्वी स्थापन केलेले पुणे नगर वाचन मंदिर सतत प्रगतिपथावर वाटचाल करीत आहे. या संस्थेस लाभलेले कारभारी मंडळ संघटना-कुशल, कार्यनिष्ठ व समाजोन्मुख आहे. सर्वश्री. **पु. ए. कढ्रकर** (कार्याध्यक्ष), **शरच्चंद्र तपस्वी** (कार्यांपाध्यक्ष), **वसंतराव साळवी** (कोषाध्यक्ष), **अ. शि. गणपुले** (सर कार्यवाह), **गं. मो. भणगे** (कार्यवाह), **रा. कृ. देशपांडे** (कार्यवाह), **ना. धों. वैद्य** (कार्यवाह), प्रभृति पदाधिकारी पुणे नगर वाचन मंदिराची धुरा सांभाळत आहेत. साहित्य संमेलनाची जबाबदारीही त्यांनी या वर्षी उचलली आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष व मराठी साहित्य महामंडळाचे कार्यवाह म्हणून **श्री. श्री. ज. जोशी** आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह म्हणून **श्री. म. श्री. दीक्षित** यांचे विशेष सहकार्य संमेलनाच्या या यजमान–संस्थेस लाभत आहे. महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे चिटणीस **प्रा. न. शं. जमदग्नि**, सहचिटणीस **डॉ. प्र. ल. गावडे**, गरवारे महाविद्यालयाचे **प्राचार्य श्री. व. गोगटे** आणि **प्राचार्य शरच्चंद्र चिरमुले** यांनी व अन्य सहकाऱ्यांनी केलेले साहाय्य तर विशेष मोलाचे आहे.

साहित्यप्रीती आणि राष्ट्रभक्ती ही मूल्ये मनोमन मानणारे **श्री. पुरुषोत्तम**

**भास्कर भावे** हे मातबर साहित्यिक संमेलनाध्यक्ष म्हणून निवडून आले आहेत. मराठी साहित्यातील त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा रसोद्ग्राही परिचय नागपूरचे **डॉ. वसंतराव वऱ्हाडपांडे** यांनी ( या अंकातील ) आपल्या लेखात करून दिला आहे. साहित्य पत्रिकेच्या वतीने श्री. पु. भा. भावे यांचे आम्ही अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतो.

## ४. माननीयांना लाभलेले सन्मान

### ( अ ) नामदार नानासाहेब गोरे

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे भूतपूर्व अध्यक्ष, थोर राष्ट्रभक्त आणि श्रेष्ठ साहित्यिक **श्री. ना. ग. ऊर्फ नानासाहेब गोरे** यांची भारताचे इंग्लंडमधील राजदूत म्हणून केंद्रशासनाने नियुक्ती केली आहे. अनुभवसंपन्नता, व्यासंगशीलता आणि समाज-मनस्कता या आपल्या गुणविशेषांमुळे ह्या नव्या कार्यक्षेत्रात नानासाहेब निश्चितच भरीव कामगिरी बजावतील.

### ( आ ) श्री. चिं. स. लाटकर

एकोणिसाव्या अखिल भारतीय मुद्रण-सौष्ठव स्पर्धेत पुण्यातील 'कल्पना मुद्रणालया'चे **श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर** यांनी यंदा चार पारितोषिके मिळविली आहेत. राष्ट्रपतिपदकाचा समावेश असलेली अशी चार पारितोषिके एकाच वेळी मिळविण्याचा बहुमान लाभणारे भारतातले पहिले मुद्रक असा लाटकरांचा उल्लेख करावा लागेल. ग्रंथगत आशयाशी संवाद असलेले मुद्रणसौंदर्य आणि रचनासौष्ठव साधण्याचा ते जाणीवपूर्वक प्रयत्न करतात, हे साहित्य पत्रिकेच्या छपाई-वरूनही जाणकारांच्या ध्यानात येईल.

मराठी मुद्रण-प्रकाशकांच्या या यशाचे रसग्रहण करणारे, 'केसरी'चे श्री. वि. स. वाळिंबे यांचे या अंकातील मार्मिक टिपण वाचकांनी अगत्य पाहावे.

### ( इ ) कविवर्य अनिल

मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष **श्री. आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ 'अनिल'** यांना नुकतेच 'नेहरू साक्षरता पारितोषिक' मिळाले आहे. साक्षरताप्रसार व समाजशिक्षण यांस उत्तेजन मिळावे म्हणून हे पारितोषिक देण्यात येते. केंद्र सरकारच्या समाजशिक्षण विभागाचे सल्लागार म्हणून आत्माराम रावजींनी काम केले. १९५२ मध्ये अमरावतीस लोकशिक्षण संस्था त्यांनी सुरू केली. १९५७ ते १९६० ही तीन वर्षे राष्ट्रीय मूलभूत शिक्षण केंद्राचे संचालक म्हणूनही त्यांनी कामगिरी बजावली.

### ( ई ) श्री. अरुण कोलटकर

**श्री. अरुण कोलटकर** हे **श्री. वा. रा. कोल्हटकर** या जुन्या पिढीतल्या

विरुध त शिक्षणतज्ज्ञांचे सुपुत्र. (या पुढच्या पिढीने मागच्या पिढीतला महाप्राण आपल्या उपनामातून वगळला आहे.) श्री. अरुण कोलटकरांच्या 'जेजुरी' या इंग्रजी काव्यसंग्रहास नुकतेच 'कॉमनवेल्थ पोएट्री प्राइझ' मिळाले आहे. पुण्याचे डॉ. रमेश धोंगडे यांनी पारितोषिक विजेत्या या काव्यसंग्रहाचा रसास्वाद याच अंकातील एका टिपणात घेतला आहे.

### (उ) डॉ. रा. चिं. ढेरे

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांनी लिहिलेल्या 'पद्स्थल : एक अध्ययन' (विसोवा खेचर विरचित 'पद्स्थल' या नवोपलब्ध ग्रंथाच्या निमित्ताने यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीचे पुनरवलोकन) या प्रबंधाचा गौरव पुणे विद्यापीठाने नुकताच केला आहे. सर्वोत्कृष्ट प्रबंधासाठी ठेवलेले 'डॉ. य. वि. परांजपे पारितोषिक' प्रस्तुत प्रबंधास विद्यापीठाने प्रदान केले आहे. हा प्रबंध 'चक्रपाणि' या नावाने पुण्यातील विश्वकर्मा साहित्यालयाने जानेवारी १९७७ मध्ये ग्रंथरूपाने प्रकाशित केला आहे.

डॉ. ढेरे यांच्या प्रस्तुत ग्रंथराजाचे मर्म विशद करणारा, पुण्यातील डेक्कन कॉलेजमधील ख्यातनाम संशोधक डॉ. शांताराम भालचंद्र देव यांनी लिहिलेला समीक्षा-लेख या अंकात अभ्यासकांना आढळेल.

### (ऊ) श्री. दारव्हेकर व श्री. किर्लोस्कर

अठ्ठावन्नाव्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून प्रसिद्ध नाटककार **श्री. पुरुषोत्तम दारव्हेकर** आणि संमेलनाचे स्वागताध्यक्ष म्हणून ज्येष्ठ उद्योगपती **श्री. शंतनुराव किर्लोस्कर** यांची निवड झाली आहे. पुण्यास डिसेंबर ७७ मध्ये हे नाट्यसंमेलन भरणार आहे.

### (ए) नटवर्य बापूराव माने

सांगलीच्या मराठी नाट्य विद्यामंदिर समितीने **नटवर्य बापूराव माने** यांना सुवर्णपदक प्रदान केले आहे. बालगंधर्वांपासून भालचंद्र पेंढारकरांपर्यंतच्या ख्यातनाम कलावंतांना यापूर्वी हा सन्मान लाभला आहे. त्या श्रेय-नामावलीत बापूरावांना जे स्थान मिळाले, ते त्यांच्या नाट्यसेवेस साजेसे आहे.

### (ऐ) डॉ. दाशरथी

आंध्र प्रदेशाचे राजकवी म्हणून प्रख्यात तेलुगू साहित्यिक **डॉ. दाशरथी** यांची नेमणूक झाली आहे. ते केंद्रीय साहित्य अकादमीच्या पारितोषिकाचेही मानकरी आहेत.

### (ओ) श्री. अखिलन

भारतीय भाषांतील सर्वश्रेष्ठ साहित्यकृती म्हणून 'चित्तिरप्पावै' (म्हणजे 'चित्रित

कथा ') या ग्रंथाची निवड भारतीय ज्ञानपीठाने यंदा केली आहे. त्या निमित्ताने प्रस्तुत ग्रंथाचे लेखक **श्री. पेरुंगलूर वैद्यलिंगम् अखिलन्दम् ऊर्फ अखिलन्** यांचा सत्कार १७ सप्टेंबर १९७७ रोजी दिल्लीस महामंत्री मोरारजी देसाई यांच्या हस्ते करण्यात आला.

—या सर्व अग्रणींचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो.

## ५. तपस्वी जनांचे अभीष्टचिंतन

(अ) **गुरुवर्य बाबूराव जगताप** नुकतेच नव्वद वर्षांचे झाले. आजवर माध्यमिक शिक्षणाच्या विकासाला त्यांनी मोठा हातभार लावला आहे. म. सा. परिषदेशी त्यांचा जुना ऋणानुबंध आहे.

(आ) ' संशोधन-मंजिरी 'कार **श्री. ना. व. जोशी** यांनी नुकतेच एक्याऐंशीच्या वर्षांत पदार्पण केले. महाराष्ट्र-कर्नाटकच्या सरहद्दीवर वावरणारे व मराठी-कानडीच्या संपर्काने सिद्ध होणारे सांस्कृतिक संचित विजापूरसारख्या दूरस्थ ठिकाणी राहून त्यांनी अभ्यासकांना संशोधनपूर्वक सादर केले आहे. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी या अंकातील आपल्या टिपणात श्री. जोशींच्या संशोधन-कार्याचा परिचय करून दिला आहे.

(इ) ख्यातनाम साहित्यिक **श्री. दत्त रघुनाथ कवठेकर** यांचा अमृत महोत्सव १८ सप्टेंबर १९७७ रोजी साजरा झाला. विखुरलेले प्रेम (१९३५), उमाळलेल्या भावना (१९३७), रेशमाच्या गाठी (१९४२), आभाळाची सावली (१९४६), रुपेरी कडा (१९५९) इत्यादी कादंबऱ्या आणि गुलाबाच्या पाकळ्या (१९३६), उजेडातील अंधार (१९३७), नादनिनाद (१९३७), चांदण्यातील सावल्या (१९४७) हे त्यांचे कथासंग्रह एके काळी बरेच गाजले. त्यांच्या या कथात्मक साहित्याचे हिंदी गुजराती अनुवाद झाले. रेशमाच्या गाठी व अपुरा डाव या त्यांच्या दोन कादंबऱ्यांवर चित्रपटही निघाले. काकासाहेब कवठेकरांची साहित्यसेवा भरघोस आणि रससिद्ध आहे.

(उ) **डॉ. जे. पी. नाईक** हे नामवंत शिक्षणतज्ज्ञ व केंद्र सरकारचे शिक्षण सल्लागार म्हणून विख्यात आहेत. शिक्षक-दिनी म्हणजे ५ सप्टेंबर १९७७ रोजी त्यांचा सत्तरावा वाढदिवस साजरा झाला.

(ऊ) **कविवर्य सुधांशू** यांनी ' निरांजनाची शुचिता व्यक्त करणारे काव्य ' सादर केले. सांगलीस ऑगस्ट १९७७ मध्ये पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या हस्ते सुधांशूंचा षष्ट्यब्दीपूर्तीचा सोहळा साजरा झाला.

(ए) लोकप्रिय भावगीत-गायक **श्री. गजाननराव वाटवे** यांची षष्ठ्यब्दीपूर्ती कोल्हापूर मुक्कामी कविवर्य सुधांशू यांच्या अध्यक्षतेखाली जुलै १९७७ मध्ये थाटाने साजरी झाली.

अनुक्रमणिका

—कला, शिक्षण आणि साहित्य या क्षेत्रांतील या सर्व व्यक्तींना दीर्घायुरारोग्य लाभो, अशी सदिच्छा आम्ही व्यक्त करतो.

**६. मराठी विश्वकोशाचे प्रकाशन**

साहित्य आणि संस्कृती मंडळाने सिद्ध केलेल्या मराठी विश्वकोशाच्या पहिल्या पाच खंडांचे प्रकाशन २५ जुलै १९७७ रोजी **महामंत्री श्री. मोरारजी देसाई** यांच्या हस्ते पुण्यास टिळक स्मारक मंदिराच्या भव्य वास्तूत झाले. **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** हे या खंडांचे प्रधान संपादक आहेत. 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' या कोशाच्या धर्तीवर रचना केलेला भारतीय भाषांतील हा सर्वांत मोठा कोश आहे. कोशाचा एकूण प्रकल्प वीस खंडांचा आहे. प्रत्येक खंड सरासरी एक हजार पृष्ठांचा असेल. एकोणिसावा खंड यापूर्वीच प्रसिद्ध झालेला आहे. देशविदेशांतील दोन हजार तज्ज्ञांचे सहकार्य या कोशासाठी घेण्यात आले आहे.

**७. संस्कृत महाकोशाची सिद्धी**

पुण्यातील डेक्कन कॉलेजतर्फे तयार करण्यात आलेल्या संस्कृत महाकोशाच्या दुसऱ्या भागाचे प्रकाशन कॉलेजच्या प्रशांत वास्तूत २५ जुलै १९७७ या दिवशी **महामंत्री श्री. मोरारजी देसाई** यांच्या हस्ते करण्यात आले. ख्यातनाम भाषाशास्त्रज्ञ **डॉ. अ. म. घाटगे** हे या महाकोशाचे प्रधान संपादक आहेत. अनेक पंडितांच्या प्रज्ञेचे आणि परिश्रमांचे फलित म्हणजे हा महाकोश होय.

**८. भांडारकर संस्थेचा महोत्सव**

चालू वर्ष हे पुण्यातील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे हीरक महोत्सवी संवत्सर होय. संस्थेचा साठावा स्थापना-दिन ६ जुलैस राज्यपाल सादिक अली यांच्या अध्यक्षतेने साजरा झाला.

**९. ऋणनिर्देश**

प्रस्तुत अंक देखण्या आणि निर्दोष स्वरूपात सिद्ध व्हावा म्हणून कल्पना मुद्रणालयाचे चालक श्री. चिं. स. लाटकर आणि परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. मो. रा. वाळंबे यांनी खूपच साहाय्य केले. श्री. श्री. ज. जोशी, श्री. म. श्री दीक्षित, श्री. वि. ग. कानिटकर, डॉ. प्र. ल. गावडे व डॉ. अ. प्र. कामत या परिषदेच्या अन्य पदाधिकाऱ्यांनी उपयुक्त सूचना करून मार्गदर्शनही केले. या सर्व सुहृदांचे आम्ही ऋणी आहो. महाराष्ट्र शासनाने या अंकासाठी सवलतीच्या दराने कागद पुरवला, याबद्दल मनःपूर्वक आभार.

**हे. वि. इनामदार**

अनुक्रमणिका

# ‘कल्पना’शील मुद्रक

वि. स. वाळिंबे

असे पाहिले तर ही गोष्ट यापूर्वीही घडून यायला काहीच हरकत नव्हती. कारण ‘प्रसन्न मुद्रणाचे प्रमुख केंद्र’ हा लौकिक कल्पना मुद्रणालयाने प्रस्थापित केल्याला आता दहा-बारा वर्षांचा काळ लोटलेला आहे. या कालावधीत अक्षरशः शेकडो मराठी ग्रंथ कल्पना मुद्रणालयाचे देखणे वेगळेपण लेवून वाचकांपुढे सादर झालेले आहेत. तरीही आतापर्यंत हुकत गेलेला योग, अखिल भारतीय मुद्रणश्रेष्ठता स्पर्धेच्या संयोजकांनी या वर्षी साधला आणि त्यामुळे श्री. चिं. स. लाटकर यांचे कल्पना मुद्रणालय ग्रंथमुद्रण आणि नियतकालिक मुद्रण या विभागांतील प्रथम क्रमांकाच्या पारितोषिकांचे मानकरी ठरले. सर्व भारतीय भाषांमधून या स्पर्धेसाठी दोन हजारांहून अधिक ग्रंथ आले होते. स्पर्धेत भाग घेतलेल्या नियतकालिकांची संख्याही अशीच खूप होती. त्यातून कल्पना मुद्रणालयात छापण्यात आलेल्या ‘शहेनशहा’ ( कॉंटिनेंटल प्रकाशन ) या कादंबरीची आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या ‘श्रीज्ञानेश्वर विशेषांका’ची प्रथम क्रमांकाच्या पारितोषिकांसाठी निवड झाली. बालवाङ्मय-मुद्रण विभागातील दुसऱ्या क्रमांकाचे पारितोषिकही कल्पना मुद्रणालयासच मिळाले. पुण्यातील ‘श्रीविद्या प्रकाशना’ची ‘सूर्यफुलराणी व थापाडे वैद्यराज’ ही बालनाटिका त्या पारितोषिकाची मानकरी ठरली. ग्रंथमुद्रण आणि नियतकालिक-मुद्रण या दोन्ही विभागांमध्ये प्रथम क्रमांकाची पारितोषिके मिळविणारे कल्पना मुद्रणालय हे पुण्यातील, नव्हे महाराष्ट्रातील पहिलेच मुद्रणालय आहे हे लक्षात घेतले म्हणजे मुद्रणाच्या अखिल भारतीय पातळीवरील गुणवत्ता-स्पर्धेमध्ये श्री. चिं. स. ऊर्फ अण्णासाहेब लाटकरांनी केवढा बहुमान संपादन केला आहे हे कळून येते.

आणि गमतीची गोष्ट अशी की, मुद्रणाच्या क्षेत्रात हे असे उत्तुंग यश मिळविणारे श्री. अण्णासाहेब लाटकर या व्यवसायाकडे वळले ते एका योगायोगामुळे. त्यांनी जीवनास प्रारंभ केला तो एक धडाडीचा राजकीय कार्यकर्ता म्हणून; आणि त्यांनी पक्ष निवडला तोही असा की, संसदीय तत्त्वज्ञानापेक्षा उलथापालथीच्या कार्यक्रमावर श्रद्धा बाळगणारा. त्यापायीच एका पक्षाच्या मुद्रणालयावर सरकारी रोष झाला आणि त्याची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी श्री. लाटकरांवर येऊन पडली. येथपासून

अनुक्रमणिका

श्री. लाटकरांचा वेगळा प्रवास सुरू झाला आणि कोलांच्या खात खात कालांतराने त्यातूनच त्यांचे स्वतःचे कल्पना मुद्रणालय साकार झाले.

सुरुवातीस त्यांनी लक्ष दिले ते मुद्रणाचा वेग वाढविण्याकडे. आपल्याकडे आलेल्या ग्रंथाचे मुद्रण शक्य तितक्या कमी कालावधीत पुरे व्हायला हवे यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यामुळे साहजिकच त्यांच्याकडे येणाऱ्या ग्रंथांचा ओघ वाढू लागला. ग्रंथाचे मुद्रण सुरू करतानाच तो ग्रंथ केव्हा पूर्ण होईल याची नेमकी तारीख श्री. लाटकर सांगू लागले आणि त्या तारखेला ग्रथ आपल्या हातात पडत आहे असा प्रकाशकांना अनुभव येऊ लागला. हा अनुभव नवीन होता. ग्रंथप्रसिद्धीची तारीख अगोदर सांगणे अशक्य आहे, असे जेव्हा या क्षेत्रातील अतिरथी महारथी आपल्या प्रदीर्घ अनुभवांचा आधार घेऊन सांगत असत, त्याच काळात, सांगितलेल्या वेळात मुद्रण पूर्ण करण्याचा विक्रम लाटकर करू लागले. एखाददुसऱ्या पुस्तकाच्या बाबतीत नव्हे, तर प्रत्येक वेळी.

आपले काम वेळेवर पुरे होईल अशी प्रकाशकांच्या मनात खात्री निर्माण केल्यानंतर आपल्या मुद्रणातील छपाईचा दर्जा श्रेष्ट प्रतीचा राहायला हवा या दिशेने लाटकरांचे प्रयत्न सुरू झाले. त्यांनी या व्यवसायाचे पद्धतशीर पूर्वशिक्षण कोठेच घेतलेले नव्हते. स्वतःच गुरू आणि स्वतःच शिष्य अशी एकलव्यी वृत्ती अंगात बाणलेली असल्यामुळे लाटकरांच्या या क्षेत्रातील प्रगतीलाही विलक्षण झपाटा प्राप्त झाला. हे सामर्थ्य संपादन करताना, मुद्रणकलेतील बारकाव्यांच्या अभ्यासाचा लाटकरांना किती उपयोग झाला हे मला सांगता येणार नाही; परंतु मला असे वाटते की, ग्रंथांसंबंधीच्या आंतरिक आस्थेपायीच श्री. लाटकरांमधला मुद्रक सुबक मुद्रणाचे एकेक रहस्य चोखंदळ निरीक्षणाने जाणून घेऊ शकला. ग्रंथांकडे ते केवळ ग्राहक म्हणून पाहात नाहीत, त्यांची मूळ दृष्टी रसिक वाचकाची आहे. प्रगल्भ संस्कारित मनामुळेच त्यांना हे शक्य झाले आहे. मराठीतील चांगले ग्रंथ आपल्या मुद्रणालयात सिद्ध व्हावेत या जिव्हाळ्यातूनच कल्पना मुद्रणालयाचा आजचा लौकिक निर्माण झालेला आहे. त्यामुळे होते काय की, प्रकाशकाने हस्तलिखित आणून दिले की, श्री. लाटकर जणू त्या ग्रंथाचा ताबाच घेतात. ग्रंथविषय लक्षात घेऊन ग्रंथाचा आकार, त्याला वापरावयाचा टाईप व कागद, मांडणीचे व जुळणीचे एकंदर स्वरूप आणि सुबक छपाई यासंबंधी त्यांचा विचार सुरू होतो. आणि हा विचार अत्यंत उचित आहे हे प्रकाशकालाही जाणवते. चांगले हस्तलिखित आले तर मुद्रकापूर्वी लाटकरांमधला वाचक जागा होतो, आणि रात्रभर जागून ते हस्तलिखित वाचून काढल्यावरच त्याच्या जुळणीस प्रारंभ होतो. त्या ग्रंथातील बलस्थाने आणि मर्मस्थाने यांचा श्री. लाटकर प्रकाशकाशी किंवा लेखकाशी ऊहापोह करतात, तेव्हा प्रतीत होतो तो त्यांचा व्यासंग. त्या वेळची त्यांची टीका टिप्पणी मिष्किल वाटत असली तरी नंतर जाणवते ती त्यांची त्या विशिष्ट पुस्तकासंबंधीची कळकळ. या कळकळीने, या आस्थेने

अनुक्रमणिका

लाटकरांमधील मुद्रकाला गुणवत्ता जोपासण्याचे बळ पुरविले आहे असे मला वाटते.

येथे आणखी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी. मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने इतर भारतीय लिप्यांच्या तुलनेने देवनागरीला मर्यादा पडतात. मात्रा किंवा वेलांटी आणि अनुस्वार, मूळ अक्षर आणि खालचा उकार किंवा ऋकार यामुळे देवनागरीची इमारत एक मजली न राहता तीन मजली होते. साहजिकच यांपैकी काहीही मागेपुढे झाले की, मुद्रणातील आकर्षकता हरवून बसते. मुळातील ही मर्यादा ध्यानात घेऊनच देवनागरीमधील मुद्रकाला ग्रंथाच्या छपाईकडे लक्ष पुरवावे लागते. शंभर-दीडशे पृष्टांच्या आणि अल्पावधीत छापल्या जाणाऱ्या ग्रंथाच्या बाबतीत अशी काळजी घेणे फारसे अवघड ठरत नाही; परंतु लाटकरांचा उत्साह एवढा दांडगा की, ' शहेनशहा 'सारख्या साडेसातशे पृष्टांच्या आणि अनेक दिवस छपाई चालणाऱ्या प्रचंड कादंबरीतही हे मुद्रणसौकर्य पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यंत राखले गेले आहे. एवढी पाने छापत असताना टाईपांचा ' चेहरा 'ही थोडासा बदलत जात असतो, आणि तरीही सारा ग्रंथ एकाच वेळी छापण्यात आलेला आहे असे वाचकाला वाटावे, ही किमया करायला मुद्रकही तेवढाच जागरूक असावा लागतो. ग्रंथाच्या वा नियतकालिकाच्या पहिल्या पानांच्या मुद्रणावर वाचक वाचनोत्सुक होणे अवलंबून असते. श्री. लाटकर याबाबत फारच चोखंदळ आणि प्रयत्नशील असतात. मुद्रण हा निव्वळ यांत्रिक व्यवहार नाही हे जाणवते ते तेव्हाच.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची त्रैमासिक ' साहित्य पत्रिका ' श्री. लाटकर यांच्याकडे मुद्रणाला येऊन आता दहा वर्षे पुरी होत असावीत. त्यांनी प्रथम ' पत्रिके 'चा आकार बदलला आणि लेखांच्या मांडणीमध्येही बदल केले. त्यामुळे जाणवू लागले ते हे की, इतर नियतकालिकांपेक्षा ' साहित्य पत्रिका ' हे वेगळे प्रकाशन आहे. मजकूर तोच असला तरी प्रसंगोचित आकार आणि मांडणी यांमुळे त्याची विशेषता परिणामकारक करता येते हे श्री. लाटकर यांनी फार चांगल्या रीतीने ओळखले आहे. ' पत्रिके 'च्या ज्या 'श्रीज्ञानेश्वर विशेषांका 'ला नियतकालिक मुद्रणातील पहिले पारितोषिक लाभले आहे, त्या अंकातील लेखांची मांडणी पोथीसारखी करताच त्या अंकाचे वेगळेपण न कळत जाणवते. साधारणतः लेखकांची नावे लेखाच्या शिरोभागी असतात, परंतु या अंकातील लेखकांची नावे अखेरीस येण्यामागे श्रीज्ञानेश्वरांसंबंधीचा लेखकांचा विनीत भाव दिसून येतो. पानांच्या दोन्ही बाजूंकडील भगवी अखंड वेलबुट्टीही पोथीशी जवळीक साधते. पोथीप्रमाणे हा अंकही सुट्या पानांच्या स्वरूपात द्यायची मूळची योजना होती, परंतु त्यायोगे वाचकाला तो अंक जपून ठेवणे कठीण जाईल हे ओळखून बांधणीचा पर्याय स्वीकारण्यात आला. मात्र ही बांधणी नियतकालिकाच्या अंगाने न जाता ग्रंथाच्या अंगाने गेली पाहिजे हेही लाटकरांनी पाहिले. अशा प्रसंगी निव्वळ व्यवहाराकडे पाहूनही चालत नाही. लाटकरांनी मुखपृष्ठाला भूर्जपत्राचे रूप दिले आणि तो परिणाम साधण्यासाठी

मंद रंगाचा वापर केला. या साऱ्या लहानसहान गोष्टी वाटतात; परंतु त्यांचा संकलित परिणाम कळत, न कळत होत असतो हे नाकारता येत नाही. किंबहुना, त्यामुळेच मोहरेदार कागदावरील विविधरंगी छपाईचा दुसरा श्रीज्ञानेश्वर विशेषांक स्पर्धेला उभा असतानाही, परीक्षकांनी साध्या कागदावर छापलेल्या या अंकाची निवड केली. शाहेनशाहाच्या मुखपृष्ठावरील रंग निश्चित करताना जो विचार करण्यात आला होता, त्यापेक्षा नेमक्या वेगळ्या विचारातून श्रीज्ञानेश्वर विशेषांकाचे मुखपृष्ठ सजले. यावरून त्यातील वर्ण्यविषयाशी मुद्रक किती तादात्म्य पावला होता हे ध्यानात येते.

ग्रंथमुद्रण हा तसा व्यापारी मुद्रणाच्या वा इतर प्रकारच्या मुद्रणाच्या तुलनेने जिकिरीचा व्यवसाय. कारण भांडवल गुंतवणुकीच्या मानाने फायद्याचे प्रमाण कमी असते. त्यामुळे अनेक मुद्रकांचा ग्रंथमुद्रण हा दुय्यम व्यवसाय ठरतो. परंतु आपण ग्रंथमुद्रक आहोत हा अण्णासाहेब लाटकरांच्या अभिमानाचा विषय आहे. प्रत्येकालाच आपापल्या व्यवसायासंबंधी आस्था असते; परंतु त्या आस्थेचे ध्यासात रूपांतर होतेच असे नाही. लाटकरांपाशी तो ध्यास असल्यामुळे मुद्रणालयामधील त्यांची लहानशी कचेरी म्हणजे लेखक-प्रकाशकांचा 'अड्डा'च झालेली आहे. लेखन-प्रकाशनाच्या कितीतरी नवीन योजनांचा जन्म त्या छोट्याशा कचेरीतच झालेला आहे. यशाच्या सुखद स्पर्शाप्रमाणे आपदांचे कठोर आघातही लाटकरांनी अंगभूत तटस्थतेने सहन केले आहेत, हे पानशेत जलप्रलयाच्या त्यांच्या वृत्तीवरून दिसून येते. मानसन्मानांनी ते चढून गेले नाहीत; संकटांनी खचून गेले नाहीत. 'ग्राहक देवो भव' म्हणून ग्राहकांना सांभाळण्यासाठी ते कमालीचे अगत्य दाखवितात; परंतु मनाला न पटणाऱ्या अटी धुडकावून लावण्याचा बाणेदारपणाही या माणसात पुरेपूर भिनला आहे. आपल्याकडे आलेले काम हे आपले काम आहे ही आस्था मात्र श्री. अण्णासाहेब लाटकर यांच्यापाशी उदंड आहे; आणि अखिल भारतीय मुद्रणश्रेष्ठता स्पर्धेमध्ये त्यांना लाभलेले सुयश हा त्या स्वाभाविक आस्थेचाच खराखुरा गौरव आहे.

■

## 'श्री विद्या प्रकाशन' संस्थेचा सन्मान

'शोध बाळगोपाळांचा : लेखक : डॉ. य. दि. फडके' आणि 'सार्थ ज्ञानेश्वरी : संपादक : श्री. म. शं. गोडबोले' या दोन अपूर्व ग्रंथांना केसरी–मराठा संस्थेतर्फे न. चिं. केळकर पारितोषिके प्रदान करण्यात आली.

पुण्यातील 'श्रीविद्या प्रकाशन' संस्थेने हे अमोल ग्रंथ प्रसिद्ध केले. या सुयशाबद्दल ग्रंथलेखक, ग्रंथसंपादक व ग्रंथ–प्रकाशक या सर्वांचे मनःपूर्वक अभिनंदन !

— संपादक, म. सा. पत्रिका

अनुक्रमणिका

# मराठी साहित्यातील ' भावे ' प्रयोग

वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे

गुणवत्ता आणि संख्याधिक्य यांचे परस्पर-प्रमाण व्यवहारात बहुधा व्यस्तत्र असते. साहित्याच्या क्षेत्रातमुद्धा प्रस्तुत व्यावहारिक सत्याचे प्रत्यंतर आल्याशिवाय राहत नाही. लेखनाची गुणवत्ता कमी होऊ न देता विपुल साहित्यनिर्मिती करणारे लेखक कोणत्याही समाजात बहुधा कमीच असतात. पुरुषोत्तम भास्कर भावे यांची गणना मी अशा दुर्मिळ लेखकांत करतो. निर्मितीचा वेग मंदावू न देता आपल्या लेखनाचा कस टिकवून धरण्याचे अजोड कसब भाव्यांनी प्रगट केले आहे. सात नाटके, सोळा कादंबऱ्या, पंचवीस ( निवडक कथा : भाग १–२ वगळून ) कथासंग्रह, बारा लेखसंग्रह, ' मुद्रा ' हा व्यक्तिचित्रांचा संग्रह आणि ' हंस ' मासिकातून भाव्यांच्या वादळी व्यक्तिमत्त्वाचे विविधरंगी पैलू अभिव्यक्त करणारी ' प्रथम पुरुषी एकवचनी ' ही रसरशीत आत्मकथा एवढा प्रचंड साहित्यसंभार पु. भा. भावे यांची भाग्यशाली नाममुद्रा माथ्यावर मिरवीत मराठीच्या साहित्यसंसारात मोठ्या दिमाखाने आज उठून दिसत आहे. भाव्यांच्या लेखी लेखन हा फुरसतीच्या वेळी करावयाचा उद्योग नसून ते त्यांच्या आयुष्यभराचे व्रत झाले आहे. सरस्वतीची अशी अव्यभिचारी उपासना करणाऱ्या भाव्यांसारख्या एकनिष्ठ उपासकाचे साहित्य तिच्या कृपाप्रसादाने मंडित झाले नसते तरच आश्चर्य ! वयाच्या पंधराव्या वर्षी भाव्यांनी ' ओम् फस् ' नावाची कथा लिहिली. आज भावे सदुसष्ट वर्षांचे आहेत. लेखनतपस्येचे अर्धशतक त्यांनी कधीच पूर्ण केले आहे. परंतु कालपुरुषाच्या ओंजळीत सतत पन्नास वर्षे राहून भावेनिर्मित साहित्यपुष्पे सुकली नाहीत. ती अजूनही टवटवीत आहेत; सतेज आहेत; तितकीच आकर्षक आहेत. आपल्या अम्लान सुगंधाने रसिकांची मने पुलकित करण्याचे त्यांचे अंगभूत सामर्थ्य अजूनही अबाधित राहिले आहे. कालस्पर्शाने ती पुष्पे विशीर्ण तर झाली नाहीतच, उलट त्यांच्या सुगंधाने कालपुरुषाच्या राकट ओंजळीलाही सुगंधित करून टाकले आहे.

पु. भा. भावे यांना मराठी रसिक ओळखतो तो प्रामुख्याने कथाकार म्हणून. मराठी कथेच्या कक्षा विस्तृत करणारे, मराठी कथेला सूक्ष्मतेचे व काव्यमयतेचे एक नवे परिमाण बहाल करणारे एक आघाडीचे कथालेखक म्हणून. परंतु भावे हे कथाकार

अनुक्रमणिका

म्हणून जेवढे मोटे आहेत तेवढेच ते कादंबरीकार म्हणूनही मोटे आहेत. नाटककार आणि चित्रपटकथालेखक म्हणूनही त्यांनी उदंड यश मिळविले आहे. आपल्या युयुत्सू लेखणीने त्यांनी एके काळी वृत्तपत्रसृष्टी गाजवून सोडली आहे. वाचकांच्या अंतःकरणाला हलवून टाकणारे रक्तोत्कट लेखन करणाऱ्या भाव्यांनी आपल्या खोचक व बोचक विनोदाने त्यांना खदखदून हसवलेही आहे. सामाजिक व राजकीय ढोंगांवर आपल्या लेखणीचे धारदार टोक रोवून भाव्यांनी अनेकांचे मुखवटे ओरबाडून काढले आहेत. प्रीतिभावनेच्या नानाविध कळा हलक्या हाताने उलगडून दाखविताना हळुवार होणाऱ्या भाव्यांनी मनाला हलविणारे अन् बुद्धी चेतविणारे धगधगीत लेखही लिहिले आहेत. क्षणभंगुर घटनेमागील शाश्वत सत्य हुडकून काढणारी भाव्यांची अंतर्भेदी दृष्टी त्या अशाश्वताला चिरंतनाच्या मखरात किती सहजपणे बसवून टाकताना दिसते! तेजस्वी सूर्यगोलावर दृष्टी स्थिर ठेवून आकाशात स्वैर संचार करणाऱ्या गरुडाप्रमाणे, आपल्या लेखणीचे विविध विभ्रम प्रगट करीत असतानाही शाश्वत मानवी मूल्यांवर स्थिरावलेली आपली दृष्टी त्या मूल्यांवरून कधीही दूर करीत नाही. त्यांचे लेखन विपुल आहे. त्यात वैचित्र्य आहे, विविधता आहे; आणि तरीही ते मौलिक आहे. कारण त्यांच्या रसिक, मनस्वी, चिंतनशील आणि ध्येयवादी व्यक्तित्वाचेच ते प्रतिबिंब आहे.

## ‘ रक्त आणि अश्रू ’

‘ रक्त आणि अश्रू ’ हे भाव्यांचे पहिले पुस्तक. ‘ सावधान ’ या वृत्तपत्रात १९३७ ते १९३९ या अवधीत प्रसिद्ध झालेल्या लेखांचा हा संग्रह. ‘ सहदेवा, थोडा अग्नी आण ! ’, ‘ बंगाल—करपून गेलेले कुसुम ! ’, ‘ आमच्या मासाहेब इतक्या सुंदर असत्या—’, ‘ विमल, तुला काय झालं ? ’ इत्यादी या संग्रहातले लेख जेव्हा प्रथमच प्रसिद्ध झाले, तेव्हा त्या लेखातील तेजस्वी काव्यमयतेने जाणते वाचक अक्षरशः भारून गेले. अच्युत बळवंत कोल्हटकरांच्या शैलीचा कमीअधिक प्रमाणात उपयोग करून लिहिलेले हे लेख जरी तात्कालिक प्रेरणेतून स्फुरले असले, तरीही वाचकांच्या अंगावर रोमांच उभे करण्याचे त्यांचे सामर्थ्य आजही कमी झालेले नाही. सहजस्फूर्त काव्यमयता, उत्तुंग कल्पनाविलास, हृदयस्पर्शी भावनाविष्कार आणि रसानुकूल शब्दयोजनेचे चातुर्य इत्यादी वैशिष्ट्यांनी नटलेले भाव्यांचे हे गद्यलेखन एकूण मराठी गद्यसाहित्यात आजही अजोड वाटते. कविवर्य ग. दि. माडगूळकरांच्या शब्दांत सांगायचे तर भाव्यांचे हे लेखन मन पेटवणारे व उजेडाची झाडे वाचकांच्या मनश्चक्षूंपुढे उभे करणारे असे आहे. प्रखर हिंदुत्वनिष्ठा ही या लेखनामागील प्रेरणा आहे. भावे आजही हिंदुत्वनिष्ठ आहेत. त्यांची ही हिंदुत्वनिष्ठा केवळ भावनिक नाही. त्यांच्या तर्कशुद्ध विचारसरणीचा तो परिपाक आहे. ‘ हिंदुधर्म हा सखोल, सूक्ष्म, उदार व

अनुक्रमणिका

सहिष्णू धर्म आहे; जेथे हिंदू नष्ट झाले तेथे सत्य, अहिंसा, बंधुता यांसारखी महान मूल्येही नष्ट झाली...ही महान मूल्ये जगायची तर हिंदू व हिंदुत्व जगले पाहिजे ' असे भाव्यांचे आजही मत आहे. तेव्हाही ते होते. ' राष्ट्ररूप हिंदुत्व हा हिंदुस्थानचा आत्मा आहे ' असा त्यांचा विश्वास असल्यामुळेच त्यांची राष्ट्रप्रीती व हिंदुधर्मविषयक श्रद्धा यांचाही आधार हिंदुत्वनिष्ठा हाच आहे. आणि याच निष्ठेतून भाव्यांचे वैचारिक लेख निर्माण झाले आहेत. भाव्यांचा राजकीय वा सामाजिक–सांस्कृतिक दृष्टिकोण हा विशिष्ट तर्कावर व अनुभवावर आधारलेला असल्यानेच या क्षेत्रातील ढोंगबाजी व व दुर्मते यांवर ते कडाडून प्रहार करतात. ' रक्त आणि अश्रू ' या संग्रहातील ' किर्लोस्करबुवांची बायकोबाजी ' हा अडतीस साली लिहिलेला लेख किंवा ' पणत्या ', ' रांगोळी ', ' अमरवेल ', ' वाघनखे ', ' विठ्ठला पांडुरंगा ' इत्यादी संग्रहांतील ' वेशर्मिला ', ' हिंदची स्वराज्याची प्रेरणा ', ' ग्रहण लागलेला रजनीश ', ' जातीयवाद ', ' अमानुष मानवतेचा निधर्मी निर्णय ', ' धर्माला मरण नाही ', ' जबलपूर प्रकरण....', ' नेहरूनंतर...मी ! ', ' लताचे लग्न ', ' विठ्ठला पांडुरंगा ' यांसारखे लेख या दृष्टीने केवळ वाचनीयच नाहीत तर मननीयही आहेत. राजकीय व सामाजिक-सांस्कृतिक क्षेत्रांतील घटनांचे सूक्ष्म निरीक्षण, उपरोध–उपहास यांची मार्मिक योजना, स्थिर वैचारिक भूमिका, स्वत्वाभिमानी दृष्टिकोण व प्रौढ तसेच वक्तृत्वपूर्ण लेखनशैली यांमुळे भाव्यांचे लेखन विचारप्रवर्तक असूनही रंजक झालेले आहे. ' पणत्या 'मधील ' शत्रूंनो ! हे पहा आमचे नवे रूप ' हा पाकिस्तानी पराभवानंतर, पासष्ट साली लिहिलेला लेख भाव्यांच्या ' रक्त आणि अश्रू 'मधील प्रभावी शैलीचे आजही स्मरण करून देतो.

## वाङ्मयकलाविषयक निबंध

ज्यांना राजकीय व सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ नाहीत अशा विषयांवरही भाव्यांनी भरपूर लेखन केले आहे. ' लवंग वेलदोडे ', ' स्मरणी ', ' आनंद सोपान ', ' रांगोळी ' या संग्रहांमधील बरेच लेख उल्लेखनीय वाटतात. ' मी माझ्या लघुकथा कशा लिहितो ? ' हा स्वतःच्या कथालेखनप्रक्रियेचे सुबोध विवरण करणारा भाव्यांचा लेख ( लवंग वेलदोडे ) जितका रोचक तितकाच माहितीपूर्ण आहे. ' स्मरणी ' मधील ' मी का लिहितो ? ', ' माझी कादंबरी आणि सत्य ', ' माझे लेखनस्वप्न ', ' विषकन्या ' हे लेखही भाव्यांच्या वाङ्मयीन व्यक्तित्वावर प्रकाश टाकणारे व म्हणून महत्त्वाचे आहेत. ' कलात्मक आनंद हा नैतिक आनंद आहे आणि नैतिक आनंद हा भौतिक आनंदापेक्षा उच्च प्रतीचा आनंद मानला जातो ' हे तत्त्व सुबोधपणे विशद करणारा ' आनंद-सोपान ', पानशेतप्रलयाचे मूर्तिमंत शब्दचित्र रेखाटणारा ' तो जलप्रलयाचा दिवस ', ' सौंदर्याचे, प्रेमाचे मोल सांगणाऱ्या या युगातील बाजारू संस्कृतीने कोणत्याही वस्तूचे

सौंदर्य शुद्ध दृष्टीने पाहण्याची व पारखण्याची आमची शक्तीच नष्ट केली असल्याची खंत व्यक्त करणारा 'मोगऱ्याची फुलं', तसेच, मलबारहिलचे नैसर्गिक सौंदर्य नष्ट करणाऱ्या उत्तुंग इमारतीमुळे आपल्या मनाला होणारी वेदना प्रगट करणारा 'पणत्या'-मधील 'पर्वतकन्येची विटंबना' इत्यादी अनेक लेख वाचताना भाव्यांची निरामय सौंदर्यदृष्टी, निकोप साहित्यविचार, सुसंस्कृत मनोवृत्ती आणि चिंतनशीलता आपल्या प्रत्ययास येते. डोळस जीवननिष्ठा ही भाव्यांच्या एकूण विचारसरणीची आधारशिला आहे. 'लेखकाचे स्वातंत्र्य हे एक सार्वभौम आणि निरपवाद मूल्य आहे' असे जरी ते म्हणत असले ( विठ्ठला पांडुरंगा !–पृ. २१ ) तरीही 'जिवंत माणसांच्या समाजातच अखेर कुठलीही कला जन्मास येत असते...कला जीवनातून उत्पन्न होते आणि त्या जीवनाला संपन्न करते, उन्नत आणि आनंदमय करून सोडते व ह्या दृष्टीने पाहिले म्हणजे काही एक परिस्थितीत जीवन हेच सार्वभौम मूल्य मानावे लागते, हेही ते स्पष्ट करतात. त्यांच्या मते 'कलेच्या प्रांतात कलेची मूल्ये सार्वभौम खरी, पण कलेचा तो प्रांत मुळी फुलाफळाला येतो तोच जीवनाच्या बहुरंगी वृक्षावर ! तो वृक्षच उन्मळून पडला, तोडला गेला म्हणजे सारेच संपले !...कलेचे उद्यान फुलवायाचे तर प्रथम जीवनाची धरित्री सुरक्षित ठेवली पाहिजे' ( लवंग वेलदोडे, पृ. ५४-५५ ). 'मुद्रा' हा व्यक्तिचित्रांचा संग्रहही भाव्यांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा व आकर्षक लेखनशैलीचा परिचायक म्हणून लक्षणीय आहे. 'वायवार' हा त्यांच्या विनोदी लेखांचा संग्रहसुद्धा ललितगद्याच्या क्षेत्रातल्या त्यांच्या आगळ्या मुलुखगिरीचे दर्शन घडवितो. या संग्रहा-तील 'कुत्री' व 'आणखी काही कुत्री' हे दोन्ही लेख भाव्यांच्या तिरकस लेखन-पद्धतीचे व विडंबनकौशल्याचे उदाहरण म्हणून अत्यंत वाचनीय आहेत.

## कथाकार भावे

भाव्यांच्या गद्यशैलीचे त्यांच्या ललित आणि वैचारिक लेखांमधून व्यक्त होणारे सर्व विलोभनीय विभ्रम त्यांच्या कथालेखनामधूनही प्रगट होतात. तात्कालिकामागील चिरंतन तत्त्वाचा सदैव शोध घेणारी त्यांची चिंतनशील वृत्ती जशी त्यांच्या निबंधां-मधून आढळून येते, तशीच ती त्यांच्या कथाकादंबऱ्यांमधूनही आढळून येते. किंबहुना भाव्यांच्या एकूण सर्व लेखनाचेच ते प्राणतत्त्व आहे. शैलीकार म्हणून प्रसिद्ध असलेले भावे आपणच निर्माण केलेल्या शैलीच्या जाळ्यात फसत नाहीत किंवा तंत्राची गुलामगिरीही पत्करत नाहीत. 'तंत्र हे अखेर कथेचे कपडे आहेत. ते तिचे शरीर आहे. बाह्याकार आहे; आत्मा नव्हे' ( लवंग वेलदोडे, पृ. १४ ), हे त्यांना माहीत असल्यामुळेच भावे कथा लिहिताना कथानकाच्या विविधतेनुसार लवचिक असे तंत्र, अशी आविष्कार-शैली स्वीकारताना दिसतात. त्यामुळेच 'सतरावे वर्ष', 'सीमेवर' यांसारख्या कथांतील नाजूक आशय व्यक्त करणारी भावशैली जितकी

नाजूक...हळुवार होते तितकीच ती ' ध्यास ', ' मुक्ति ' यांसारख्या विराट आशयाच्या कथांच्या वेळी उद्दाम काव्यमयता घेऊन प्रगट होते. अर्थगर्भ, नादमधुर अशा वेचक व वेधक शब्दांची योजना करून भाव्यांनी या कथांमधून उदात्ततेचे जे भव्य देऊळ उभे केले आहे ते मराठी कथासृष्टीत तरी अजोड आहे. स्वा. सावरकरांच्या ' जगन्नाथाचा रथोत्सव ' या कवितेतील विराट कल्पनाशक्तीचे स्मरण व्हावे अशा या संपन्न कथा ! अशा शब्दांच्या पुष्पक विमानात बसलेले वाचकाचे मन त्याच्या नकळत एका शाश्वत जीवनसत्याच्या अयोध्येत येऊन पोहोचते ! किंबहुना, मानवी जीवनातील सत्याचा शोध भावे आपल्या कथालेखनाद्वारे सतत घेत असतात. ' कोणतीही उत्कृष्ट कथा हे एक जागते सत्य असते. ते भूतकाळाविषयीचे सत्य नसेल तर कथेच्या सामर्थ्याने भविष्यकाळ तिला सत्यरूप देईल ', हे भाव्यांनी ' मी माझ्या लघुकथा कशा लिहितो ? ' या लेखात केलेले विधान या दृष्टीने मननीय आहे. त्यांच्या कित्येक कथा ह्या एखाद्या मानसिक सत्यावर, वैशिष्ट्यांवर, अवस्थेवर वा व्यापारावर आधारलेल्या आहेत. त्यामुळेच या कथांतून ज्या घटना येतात त्या साधनरूप असतात; साध्य नसतात. त्यांच्या अनेक कथा, त्यांच्या बहुतेक कादंबऱ्यांप्रमाणेच आत्मनिवेदनात्मक आहेत; कारण हे आत्मनिवेदन जीवनविषयक सत्याच्या आविष्काराला कलात्मक रूप देण्याच्या दृष्टीने त्यांना उपयुक्त वाटते. भाव्यांच्या कथासृष्टीतील विविध पात्रे विचार करणारी आहेत. जीवनातील घटनाचक्रामागील कारणपरंपरेचा शोध घेणारी आहेत. कारण त्यांनी आयुष्य भोगलेले आहे आणि त्यांचा हा भोगवटाही विविध प्रकारचा आहे.

कुरूप शरीर असू शकतं बाळासाहेब, माया कुरूप असत नाही. जिथं माया जडते, तिथं ती सारं सुंदरच करते ! ' हे सांगणारी ' संगम 'मधील विमल ( ध्यास ), ' आपण सारी खरोखरीच सहृदय आणि सुसंस्कृत माणसे आहोत काय ? की सहृदयतेचे आणि सुसंस्कृतीचे आपण नुसते ढोंग करीत आहोत ? ' असा परखड प्रश्न विचारून आपल्यातल्या सुप्त विचारशक्तीला धक्का देऊन जागे करणारा ' टरीव ठशाची गोष्ट ' मधील मी ( मुक्ति ), ' म्हातारं वय हाच एक आजार आहे बाबा ! ह्या वयात पुष्कळ गोष्टी कळत असूनही वळत नाही ' असे अनुभवजन्य सत्य बोलून दाखविणारे ' न्यायमूर्ती 'मधील टेंबेमास्तर, ' स्त्रीपुरुषांचं प्रेम ही एक फार पवित्र आणि फार कोमल वस्तू आहे. तिचं सार्वजनिक प्रदर्शन करणं हे पाप आहे ' या शब्दांनी, प्रेमभावनेचे विकृत प्रदर्शन करणाऱ्या आपल्या प्रियकराला बजावणारी व त्यासाठी त्याच्याशी ठरलेले लग्न मोडून टाकणारी ' नादान 'मधली यमुना ( रात्र ) अशी असंख्य रेखीव पात्रे भाव्यांच्या कथासृष्टीतून सजीव होतात व वाचकांना अंतर्मुख बनवतात. ' सतरावे वर्ष ', ' सीमेवर ', ' स्वप्न ', ' हिमानी ', ' सुगंध ', ' फुलवा ', ' सावल्या ' यांसारख्या कथांमधून भावे ज्या कुशलतेने प्रीतिभावनेचे विविध आलेख आपणांपुढे उभे करतात, त्याच कुशलतेने ' दुःख ', ' स्पर्श ', ' पाषाण ', ' एका

झाडाचा मृत्यू', 'न्यायमूर्ती', 'पुतळा', 'कावळ्याची गोष्ट', 'चौदा मिनिटे', 'अखेर' इत्यादी गहन आशयाने संपृक्त असलेल्या कथांचेही पट उलगडत जातात. भाव्यांच्या प्रेमकथा ह्याही, तसे पाहिले तर, रूढार्थाने प्रेमकथा नाहीतच. मानवी जीवनातील बाह्य घटनांपेक्षा त्या घटनांना आधार देणारे पायाभूत सत्य शोधण्याचा त्यांचा प्रयत्न अशाही कथांद्वारे चालूच असतो. त्याचमुळे त्यांच्या प्रेमकथा केवळ शृंगारकथा होत नाहीत. 'सुगंध', 'हिमानी' या कथा या दृष्टीने मुद्दाम पाहण्याजोग्या आहेत. स्त्री-पुरुषांचे प्रेम या कथांतून व्यक्त होत असले तरी त्याचे परिमाण किती वेगळे आहे...पार्थिवतेच्या मर्यादा ओलांडून जाणारे आहे ! मानवी जीवनातील रती आणि विरक्ती, त्याग आणि भोग, सुख आणि दुःख, क्षुद्रता आणि उदात्तता, कामवासना आणि शृंगार यांसारख्या अनेकविध द्वंद्वांचे वस्तुनिष्ठ भूमिकेवरून चित्रण करीत करीत भावे जीवनाचे गूढ उकलण्याचा सतत प्रयत्न करीत असतात. 'ध्यास' या कथेतील अनंत जगन्नाथ ब्रम्हे यांचे तत्त्वचिंतन जे भावोत्कट होते ते याच कारणामुळे ! कारण ते प्रश्न सत्यच असतात व मानवी व्यवहारातील विविध प्रवृत्तींचे अस्तित्वही सत्यच असते ! भावे हे जीवनावर मनःपूर्वक प्रेम करणारे जीवनार्थी लेखक आहेत...एक जीवनयात्री आहेत. जीवनाचे अनेक अंगांनी दर्शन घेण्याचा त्यांना हव्यास आहे. याच हव्यासातून भाव्यांनी आपल्या अनेक कथांतून 'स्त्री'चे चित्रण करण्याचा प्रयास केला आहे. कारण 'स्त्री हे अनादिकालापासून असेच विकट गूढ आहे. ते जगाला तर कधी पूर्णपणे उलगडलेले नाहीच, पण तिचे तिलाही नाही ! तिच्या ह्या गूढतेतच तिची थोरवी आणि तिची क्षुद्रताही आहे ! तिला उपमा केवळ रात्रीचीच शोभेल ! जितकी उजळ, तितकीच काळी ! जितकी सुंदर, तितकीच कुरूप ! जितकी उदात्त तितकीच उच्छृंखल !' असा त्यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोण आहे. (रात्र–पृ. ३४). त्यामुळेच भाव्यांच्या स्त्रीविषयक कथांमधूनही शारीरिक वर्णन आढळत नाही. विकारांच्या पातळीवर सरपटत राहणारी कथा भावे लिहीत नाहीत. सामान्य लेखकांना स्त्री-देहाचे व स्त्री-पुरुषाच्या एकान्ताचे वर्णन करताना स्वैरचित्रणाचा जेथे मोह व्हावा अशा मोहाच्या कितीतरी निसरड्या जागा भाव्यांच्या कथांमधून डोकावतात. पण भावे आपला तोल ढळू देत नाहीत. शरीर हे प्रेमाचे आलंबन असले तरी शारीरिक संबंधापुरतेच ते प्रेम मर्यादित असत नाही, शरीरापलीकडच्या अंतरात्म्यापर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न ते करीत असते हे भाव्यांचे प्रेमविषयक तत्त्वज्ञान आहे. या निकोप तत्त्वज्ञानामुळेच त्यांच्या प्रेमकथांना उथळ शृंगारकथांचे स्वरूप आले नाही व यातच कलावंत म्हणून भाव्यांचे मोठेपण आहे.

मानवी व्यवहारामागील वृत्तिप्रवृत्तींचा शोध घेत असतानाच उदात्त मानवी मूल्यांची जपणूक करण्याचा प्रयत्न भाव्यांची कथा करीत असते व त्यामुळे तिच्या ठिकाणी एक प्रकारचे गांभीर्य दिसून येते. जिवंत व्यक्तिचित्रण, प्रत्ययदर्शी वर्णन-

शैली, आवश्यकतेनुसार कमी-अधिक प्रमाणात डोकावणारी चिंतनशीलता, गतिमान संवाद व त्यातून व्यक्त होणारे प्रभावी जीवननाट्य इत्यादी वैशिष्ट्ये घेऊन अवतरणारी भाव्यांची कथा वाचकाच्या मनात घर करते, जीवनाचे रहस्य त्याच्यापुढे उलगडून दाखवते व त्याचा अनुभव समृद्ध करीत त्याला अंतर्मुख करते. त्याला सुखावते आणि विषण्णही करते. ' चौदा मिनिटे ', ' झडप ', ' हिमानी ', ' कावळ्याची गोष्ट ' या कथा उदाहरणादाखल देता येतील. अशा अनेक कथा या संदर्भात उल्लेखनीय आहेत.

. मात्र यावरून भावे यांच्या कथाविश्वात केवळ गांभीर्यालाच स्थान आहे असे समजणे बरोबर ठरणार नाही. जीवनात आसूबरोबरच हसूही आहे. औदास्याप्रमाणेच हास्यालाही स्थान आहे. भावे हे जाणतात म्हणूनच त्यांच्या समृद्ध कथाविश्वात वाचकांना खदखदून हसविणाऱ्या कथांचाही आढळ होतो. 'पिंगट पेटीचे रहस्य' व 'सात मजले' हे त्यांच्या विनोदी कथांचे संग्रह. 'आइस्क्रीम', 'मदालसाख्यान', 'बांगड्या अर्थात साक्षात्कार ' या वरील संग्रहांतील कथा किंवा 'पहिला पाऊस' या संग्रहामधील 'विश्वकर्मा चित्रालय' ही कथा भाव्यांच्या निर्मळ विनोदी कथांचे प्रतिनिधित्व यशस्वीपणे करू शकतील. मानवी जीवनातील अतर्क्य अनुभवांचा आधार घेऊन लिहिलेल्या 'चुटक्या'सारख्या गूढकथाही लक्षणीय ठरतात. कथाकार म्हणून भाव्यांनी मिळविलेला लौकिक उंचावणाऱ्या या कथा निश्चितच नाहीत. तथापि भाव्यांच्या बहुमुखी लेखनकळेचे प्रत्यंतर देण्याच्या दृष्टीने त्या उल्लेखनीय वाटतात.

' पहिला पाऊस ', ' पिंपळपान ', ' ओला दिवस ' अशा तरल अनुभवाच्या कथाही भाव्यांनी यशस्वीपणे हाताळल्या आहेत. निसर्ग आणि मानव यांच्यातील अनुबंध व्यक्त करणाऱ्या या कथा हृद्य आहेत. विविध स्वरूपाचे जिवंत जीवनानुभव, मानवी जीवितामागील मूलभूत प्रेरणांचा शोध घेणारे सखोल चिंतन, उत्कटतेचा स्पर्श झालेली आविष्कारशैली, उदात्त मानवी जीवनमूल्यांविषयी गाढ श्रद्धा, अनुभवांची विविधता आणि जातिधर्मांच्या कृत्रिम भिंती ओलांडून जाणारी व्यापक सहानुभूती इत्यादी कारणांमुळे भाव्यांची कथा एकूणच मराठी कथाविश्वात आपल्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वामुळे प्रभावीपणे उठून दिसते.

## भावे यांचे कादंबरीलेखन

भाव्यांचे कादंबरीलेखन त्यांच्या कथालेखनाइतकेच उजवे व कसदार आहे. ' अकुलिना ' ( १९५० ) ही त्यांची पहिलीच स्वतंत्र सामाजिक कादंबरी. एकाच व्यक्तीने लिहिलेल्या पत्रशैलीचा अवलंब करून लिहिण्यात आलेल्या प्रस्तुत कादंबरीतून भाव्यांनी ' एक अतिशय Intimate अनुभव, उत्कट अनुभव ' व्यक्त केला आहे व तो यशस्वी झाला आहे. मराटीत ह्या तंत्राचा वापर भाव्यांनी प्रथमच केला; कारण

' या ( म्हणजे एकाच व्यक्तीने लिहिलेल्या पत्रांच्या ) तंत्रात liberties घेता येतात, personal touch येतो, analysis करता येते, intimacy आणि warmth आणता येते. ' ( कथा सृजनाची, पृ. ११ ) ' पाप करायचा आयुष्यातला एकुलता एक चान्स म्हणजे तारुण्य ' अशी वृत्ती घेऊन मुंबईला वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठी गेलेला मधुकर गणेश बर्वे आणि वेश्या कुळात जन्मली असतानाही कुलवतीचे जीवन जगण्याचे स्वप्न पाहणारी सुरंगा शिरोडकर ही तरुण सेल्सगर्ल यांच्यातील संबंधाची ही कथा. मधूवर मनःपूर्वक प्रेम करीत असल्यामुळे सुरंगा त्याच्या आग्रहाला बळी पडते व त्याच्यावर—त्याच्या प्रेमविषयक निष्टेवर—विश्वास टेवून त्याला सर्वस्व अर्पण करते. मधूने विश्वासघात केल्यावर सुरंगा निरुपायाने शरीरविक्रयाच्या मार्गावर ढकलली जाते. पतनाचे व अपेष्टांचे शेवटचे टोक ती गाटते व शेवटी रोगजर्जर होऊन ती इस्पितळात येते. लग्नकार्य झालेला व डॉक्टर म्हणून नावलौकिक मिळविलेला यशस्वी मधू आपल्याच इस्पितळात रुग्णशय्येवर पडलेल्या सुरंगाला पाहतो व तरीही तिला तो ओळख दाखवीत नाही. ह्या शेवटच्या निर्दय आघाताने हाय खाऊन सुरंगा वरच्या मजल्यावरून खाली उडी घेते व जीवन संपविते.

–तसे पाहिले तर कादंबरीच्या बहुतेक सर्व भागांत ( म्हणजे एकूण ३९ पत्रांपैकी ३६ पत्रांत ) मधूने सुरंगाशी केलेल्या चेष्टितांचे वर्णन आहे. कमू प्रधानने मधूला प्रेमाच्या बाबतीत धोका दिल्यामुळे तरुण स्त्रीविषयी एक प्रकारे अढी बाळगणारा मधू ' बायकांशी संबंध येऊ द्यावा, मात्र त्यांनी आपणांला बनविण्याऐवजी आपणच त्यांना बनवावं ' हा मन्मथ बॅनर्जी या त्याच्या रंगेल मित्राचा सल्ला शिरोधार्य मानतो व सुरंगाचे प्रेम हेही एक नाटकच समजून तिच्या जीवनाशी क्रूर खेळ खेळतो. आपल्या या हृदयशून्य व्यवहाराचा तिच्या जीवनावर काय परिणाम होईल याची त्याला पर्वा नसते. सुरंगाला झिडकारून मधू डॉक्टर बनतो, जर्मनीत जाऊन गुप्तरोगचिकित्सक होतो व लग्न करून प्रतिष्ठेचे जीवन जगू लागतो. आपल्या दुर्वर्तनाचे त्याला पूर्णतः विस्मरण झालेले असते. दहा वर्षांनंतर रोगग्रस्त झालेली सुरंगा त्याला दिसताच त्याला आपल्या निर्मम व्यवहाराचे स्मरण होते; तिच्या एकनिष्ठ प्रेमाचेही स्मरण होते आणि ' जिचं जीवन मला फुलविता आलं असतं, तिचं जीवन मी उद्‌ध्वस्त करून टाकलं ' या अपराधाच्या टोचणीने तो आक्रांत करून उठतो. कादंबरीच्या शेवटी मधूने केलेल्या या आक्रांताचे भाव्यांनी इतके प्रत्ययकारी वर्णन केले आहे की, ते वाचताना वाचकाचे मन व्यथित होते. संपूर्ण कादंबरीलाच एक वेगळे परिमाण प्राप्त होते. प्रस्तुत कादंबरीविषयी अभिप्राय देताना डॉ. अ. ना. देशपांडे यांनी ' अभिरुचीच्या अभिजात पातळीवरून खाली येण्याचा आणि थिल्लर चेष्टेखोरीत रमण्याचा मोह ' पु. भा भावे ह्यांना ' अकुलिना ' ही कादंबरी लिहिताना झाला असा जो आरोप केला आहे ( आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास, प्रथमावृत्ती, पृ. २२३ ),

अनुक्रमणिका

तो म्हणूनच निराधार वाटतो. आजपर्यंत सुरंगाच्या संबंधात केवळ विकाराच्या पातळीवरच सरपटणारे मधू बर्वेचे मन तिच्या उत्कट प्रेमभावनेचा साक्षात्कार होताच कसे उजळून निघते व त्यामुळे त्याचे सारे जीवनच पश्चात्तापाच्या प्रचंड वावटळीने कसे गदगदा हलते, याचे भाव्यांच्या लेखणीने केलेले चित्रण विलक्षण प्रभावी आहे. भाव्यांनीच ' स्वामिनी ' या नाटकातील नायकाच्या तोंडी घातलेले शब्द वापरून सांगायचे तर, जिचा दर्शनी मुखवटा कॉमेडीचा आहे अशी ही मराठीतील प्रभावी ट्रॅजेडी आहे. ' एका उज्ज्वल विकाराच्या क्रूर उन्मादाने भारावून मी तिला अगदी उघड्या डोळयानं दंशामागून दंश दिले आणि विखारलेल्या जिण्याचे आचके एकट्यानं घ्यायला तिला तसंच सोडून दिलं ', ( पृ. १२७ ) हे मधूचे करुण उद्‌गार वाचून त्याच्या पूर्वकृत्याविषयी त्याचा तिरस्कार न वाटता त्याची कीव येऊ लागते. भाव्यांच्या लेखणीचे हे यश अपूर्व आहे.

पुरुषत्वहीन पतीच्या पत्नीची मनोव्यथा हळुवारपणे चित्रित करणारी भाव्यांची ' वर्षाव ' ( १९५८ ) आणि प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर तिच्या स्मृतीशी एकनिष्ठ राहून कर्तव्यबुद्धीने जीवन जगणाऱ्या एका संपन्न, सुविद्य, यशस्वी आणि निरोगी अशा तरुण प्राध्यापकाचे निग्रही जीवन साकार करणारी ' अंतराळ ' ( १९५७ ) ह्या दोन्हीही वैशिष्ट्यपूर्ण कादंबऱ्या आहेत. आकर्षक रूप आणि गृहिणी म्हणून यशस्वी होण्यासारखे सर्व सद्‌गुण असतानाही पौरुषहीन पतीशी नियतीने जन्मगाठ बांधल्यामुळे स्त्रीचे जीवन कसे निरर्थ होऊन जाते, याचे करुण चित्र भावे ' वर्षाव '-मध्ये मोठ्या ताकदीने उभे करतात. कुसुम ही या कादंबरीची नायिका. तिचा कोणताही अपराध नसताना पुरुषसहवासाचा निसर्गदत्त अधिकारही आपल्याला मिळू नये याबद्दल मनाला खंत वाटत असतानाच कामवासनेच्या प्रबल ऊर्मीपायी, आजपयत ज्याचा मनःपूर्वक तिरस्कार केला, त्या दाबकेलाच ती सरतेशेवटी जवळ करते हे वाचून तिच्याविषयीची अथांग करुणा मनात दाटून येते. ' अकुलिना 'मधील मधू बर्वे व ' वर्षाव 'मधील कुसुम या दोन्ही व्यक्तींचे वर्तन रूढ सामाजिक नीतिमत्तेच्या दृष्टीने अयोग्य आहे यात शंकाच नाही. पण तरीही त्यांचे वर्तन स्वाभाविक वाटते, कारण मानवी प्रवृत्तीचा तो एक प्रबल आविष्कार आहे, हे वाचकांना नाकारता येत नाही. ' अंतराळ ' या कादंबरीत प्रेम या भावनेचे दिव्यत्व भावे वर्णन करतात. नारायण गोपाळ देशपांडे हा तरुण प्रोफेसर या कादंबरीचा नायक. दोन वर्षांच्या वैवाहिक जीवनानंतर त्याची पत्नी कमला एक मुलगी मागे ठेवून मरण पावते व नारायण उद्‌ध्वस्त होऊन जातो. विधुरावस्थेत चार वर्षे काढल्यानंतर कमलिनी कर्वे या सुंदर व सद्‌गुणी युवतीशी त्याचा परिचय होतो. चांगुलपणा ओळखणारी आणि चांगुलपणावर तात्काळ प्रेम करणारी कमलिनी नारायणावर प्रेम करू लागते. परंतु तो तिला मुळीच प्रतिसाद देत नाही. त्याचे चित्त मातीपलीकडे गेलेल्या चैतन्यरूपी

'कमला 'कडे लागलेले असते. त्यामुळे तो कमलिनीची उपेक्षा करतो. 'जगातल्या कुठल्याही एका चांगल्या स्त्रीचा पुरुषाला स्वीकार करता येतो. तिच्यावरच त्याला प्रेम करता येतं. ह्या जन्मी तो तिचा असतो. जन्मोजन्मी तिचाच असतो' हे नारायणचे निश्चित मत असते व कमलिनीचा स्वीकार करणे म्हणजे दिवंगत पत्नीशी व तिच्या प्रीतीशी प्रतारणा करणे होय, असे त्याला मनःपूर्वक वाटत असते. कमलिनीचेही नारायणवर तसेच उत्कट प्रेम असल्याने 'आता मलाही दुसऱ्या पुरुषाचा विचार शिवणार नाही. ह्या जन्मी नाही, दुसऱ्या जन्मी नाही. मी जन्मोजन्मी तुमच्या मागे भटकत फिरेन. तेवढंच सुख माझ्या दैवात आहे', असा निर्धार व्यक्त करते! या गुंतागुंतीतून सोडवणूक करण्यासाठी व कमलिनीकडे ओढ घेऊ पाहणाऱ्या मनाची धाव थांबविण्यासाठी नारायण गृहत्याग करतो व नंतर कमलिनीही त्याच्या शोधार्थ बाहेर पडते.

—अंतराळाची ओढ म्हणजे मातीपलीकडल्या चैतन्याची ओढ. नारायण व कमलिनी या दोन्ही व्यक्तींना ही ओढ लागलेली आहे व त्यामुळेच 'अंतराळ' ही कादंबरी अत्यंत उदात्त झाली आहे. नारायण-कमलिनी यांच्यातील संवाद हे या कादंबरीचे एक फार मोठे बलस्थान आहे. शरद्‌बाबूंच्या कलाचतुर लेखणीचे स्मरण व्हावे अशा कौशल्याने भावे कमलिनीचे चित्र रेखाटतात. शोकात्म हे विशेषण या कादंबरीला देता येत नसले तरी वाचकांना एका उदात्त व्यथेचा अनुभव देणारी ही कादंबरी आहे यात संशय नाही. 'माणसाचे कपडे पालटले, पण मन पालटलं नाही. त्याच्यातला शिकारी अजून मेला नाही. रानटी वृत्ती मेल्या नाहीत', असे कथन करणारी 'व्याध' ही कादंबरी पुरुषाच्या रक्तातील स्त्रीविषयक वासनेची प्रबलता प्रभावीपणे वर्णन करते. 'पुरुष हा जन्मतःच व्याध आहे. शिकार करणे ही त्याची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. शिकार ही घाणेरडीच असते. शिकार कोणतीही असो...मौज आहे ती खेळात आहे! मागे धावण्यात आहे! पाठलागात आहे!...ज्याचा पाठलाग केला जातो तो प्राणी महत्त्वाचा नाही! महत्त्वाचा आहे तो पाठलाग!...त्यात खूप thrill आहे...It is the game that matters!...जिंकणं, आपलं नाही ते आपलं करणं! प्राणी लोळवणं! ते एक व्यसन आहे. हे व्यसन पुरुषांच्या रक्तात अनादिकालापासून भिनलेलं आहे', हे 'व्याध'च्या नायकाचे उद्‌गार (पृ. १३१) म्हणजे जरी आपल्या स्वैर वर्तनाचे समर्थन करण्यासाठी काढलेले उद्‌गार असले तरी ते सहजासहजी नाकारता येण्यासारखे नाहीत. अर्थात, पारध केवळ पुरुषच करतो असे भाव्यांचे मत दिसत नाही. पुरुषांची पारध करणाऱ्या रजनी रेगेसारख्या स्त्रियाही भावे रंगवितात आणि संस्कृतीचे बंधन नसलेले मानवी मन प्रकृतीच्या अधीन होऊन स्वैर व्यवहार करीत सुटते हे अप्रत्यक्षपणे सूचित करतात. परिस्थितीने लादलेले कौमार्य स्त्रीजीवनाची किती भयानक परवड करते याचे अतिशय भेदक चित्रण

अनुक्रमणिका

‘ आग ’ या कादंबरीतून आढळते. निसर्गाने स्त्री-पुरुषांच्या ठिकाणी उत्पन्न केलेली वासनेची आग भडकणार नाही अशी खबरदारी घ्यायला हवी, अन्यथा त्या आगीच्या ज्वाला मानवी जीवनातील मूल्ये भस्मसात केल्यावाचून राहणार नाहीत, असा विचार ही कादंबरी वाचून संपविल्यानंतर मनात घर करून राहतो.

प्रेम या विषयावरील भाव्यांची सर्वोत्कृष्ट कादंबरी म्हणून ‘ अडीच अक्षरे ’ ( १९६३ ) या कादंबरीचा उल्लेख करावासा वाटतो. मराठीतील ही एक अपूर्व कादंबरी आहे. भाव्यांचे प्रेमविषयक सारे तत्त्वज्ञान या सुमारे सव्वाशे पृष्ठांच्या कादंबरीत सामावले आहे. अरविंद गोखल्यांच्या मते ही उत्कृष्ट कादंबरी लिहून भाव्यांनी कादंबरीचे सर्व साचे मोडून टाकले आहेत. मित्रमंडळीच्या सहज गप्पांतून प्रेम या विषयावरील चर्चेला प्रारंभ होतो आणि प्रेमभावनेचे निरनिराळे पदर उलगडत जातात. ‘ आपण ज्याला विचार म्हणतो, व्यवहार म्हणतो तो प्रेमाला सुचू लागला तर ते प्रेम राहणार नाही. तो हिशेब होईल. आईचं प्रेम, बायकोचं, बहिणीचं...देशभक्ताचं आणि संतांचंही प्रेम कधी व्यवहाराची गणितं मांडत नाही ’ हे लेखक सांगतात व त्याच्या पुष्ट्यर्थ उदाहरण म्हणून ‘ प्रिन्स ’ ( कु. माणिक दुर्वे या शिक्षिकेचा देखणा, शूर व शहाणा कुत्रा ) आणि ‘ लिली ’ ( कुत्री ) या दोघांची अनोखी कथा सादर करतात. उत्कट प्रीतीचे विविध धागे उलगडणारी ही अनोखी कथा अश्लीलतेचा स्पर्शही होऊ न देता भावे ज्या कलात्मकतेने सांगतात तिला जोड नाही ! सारा उस्मान व आनंद पंडित, नवाब कादरजंगबहादूर यांची चौथी पत्नी जोहरा व किसन, गणू नोकर व गीताबाई इत्यादी पात्रांच्या माध्यमातून फुलविलेली ‘ अडीच अक्षरे ’ ही कादंबरी अत्यंत काव्यमय व मन खिळवून ठेवणारी अशी आहे. प्रेमात शारीरिकतेचा अंश अपरिहार्यपणे येत असला तरी ती भावना शरीरापलीकडल्या दिव्यत्वाशी नाते जोडणारी असते, हेच भावे या पात्रांच्या द्वारे विशद करतात. भाव्यांच्या चिंतनशील प्रतिभेतून उतरलेले एक उदात्तरमणीय असे प्रेमोपनिषद म्हणून ‘ अडीच अक्षरे ’ या कादंबरीचे वर्णन केले तर ते अतिशयोक्त होऊ नये. मोठ्या सत्त्वाची, मोठ्या ‘ Flight ’ ची भूमिका ज्या साहित्यातून आढळते ते साहित्य मोठे असते असे भाव्यांचे कथन आहे. मोठ्या सत्त्वाची कलाकृती मोठ्या ‘ Values ’ ना आवाहन करणारी असते...मोठ्या सत्त्वाचा अर्थ ‘ Spiritual values ’ पाशी पोहोचतो असेही ते सांगतात. ‘ अंतराळ ’मधील नारायण आणि कमला ही पात्रे, त्याचप्रमाणे ‘ अडीच अक्षरे ’मधील प्रिन्स, जोहरा–किसन इत्यादी पात्रेही असेच मोठे सत्त्व प्रगट करणारी आहेत व म्हणूनच भाव्यांच्या या कादंबऱ्यांचे मोल विशेष आहे.

‘ रोहिणी ’, ‘ पिंजरा ’, ‘ दर्शन ’, ‘ मागं वळून ’, ‘ सायंकाळ ’, ‘ शेवटचे दिवस ’ इत्यादी कादंबऱ्याही उल्लेखनीय वाटतात. ‘ लेखकाच्या प्रत्येक कृतीत त्याच्या अनुभवांचं, व्यक्तिमत्त्वाचं किंवा दृष्टिकोणाचं प्रतिबिंब सापडतं ’ असे एक विधान ‘ शेवटचे

दिवस ' या भाव्यांच्या कादंबरीचा नायक करतो ( पृ. ५१ ). वरील कादंबऱ्यांपैकी बहुतेक कादंबऱ्यांच्या बाबतीत हे विधान खरे आहे. विशेषतः अंतिम चार कादंबऱ्या तर कमीअधिक प्रमाणात भाव्यांचे चरित्र सांगणाऱ्याच वाटतात, त्यांच्या आत्माविष्कारात्मक स्वरूपामुळे तर विशेषच वाटतात. सामाजिक हिताला पोषक ठरणारी जुनी जीवनमूल्ये डोळ्यांसमोर ढासळत असतानाच मानवी व्यवहारात सद्गुणांपेक्षा पैसा आणि व्यावहारिक प्रतिष्ठा यांना भलतेच मोल चढलेले पाहून भावे व्यथित होतात. कर्तव्यासाठी वैयक्तिक भावभावनांना तिलांजली देण्यासाठी तत्पर असलेली जुनी पिढी व स्वसुखाचाच तेवढा विचार करणारी नवी पिढी यांच्यातील संघर्षाने ते व्याकूळ होतात. आदर्शापासून ढळलेल्या स्त्रिया, पैशासाठी व स्वार्थासाठी कसल्याही खालच्या पातळीवर उतरणारी माणसे, यांत्रिक संस्कृतीने उभारलेल्या पिंजऱ्यात अडकून पडलेली स्वाभाविक जीवनेच्छा या साऱ्याच गोष्टी भाव्यांना अस्वस्थ करून सोडतात. नैसर्गिक मोहांना मर्यादित ठेवणारी अनेक बंधने, शिष्टाचार, संकेत आणि पापपुण्याच्या कल्पना आज सैल होऊ लागल्यामुळे सामाजिक नीतिमत्ता ढासळताना पाहून त्यांना दुःख होते. पण त्याचबरोबर पुढे वाहणारी ही जीवनाची लाट मागे परतविणे शक्य नाही हेही ते जाणतात. ही त्यांची सारी प्रतीती वरील कादंबऱ्यांमधून शब्दरूप घेताना दिसते. रेल्वेमधून सेवानिवृत्त झाल्यावरही गवळ्याचा धंदा करून कुटुंबपोषण करणारे व त्यासाठी आपल्या साऱ्या सुखस्वप्नांना तिलांजली देणारे बाबा मुळे आणि ' माझ्या आयुष्याशी मी कुणाला जुगार खेळू देणार नाही...उघड्या डोळ्यांनी मी माझ्या आयुष्याची माती होऊ देणार नाही ' असे बजावीत स्वतःच्या कल्पनेनुसार सुखाचा शोध घेण्यासाठी वडिलांचे घर सोडून बाहेर पडलेली रोहिणी ( रोहिणी ), परिस्थितीच्या आणि सभ्य कल्पनांच्या पिंजऱ्यात अडकल्याने दुःखी झालेले दिगंबरपंत व त्यांची पत्नी सगुणाबाई, ' आयुष्य म्हणजे सगळा जुगारच आहे ! जन्माला नियम नाही, मरणाला नियम नाही, सुखदुःखांना नियम नाही. तसं आहे काय तुमच्या हातात ? सगळा जुगारच आहे ! ' असं बोलून टाकणारा अविवाहित व जुगारी वसंतराव, जराजर्जर होऊनही आसक्ती न सुटलेले धोंडूकाका आणि ' मरायची छाती नाही ' म्हणून निरुपायाने जगणारी अन्य माणसे (पिंजरा), ' माझ्या श्रद्धांशी शत्रुत्व प्रत्यक्ष माझी मुलंच करतात ' या अनुभवामुळे कुटुंबात राहूनही एकटेपणाचे दुःख भोगणारा महादेव करमरकर आणि ' मेलेल्या मनाचं विद्रूप थडगं ' झाल्यामुळे दिसणाऱ्या तरुणीवर झडप घालून आपल्या वासनेचे हिडिस प्रदर्शन घडविणारे वयोवृद्ध नाना कुलकर्णी, त्याचप्रमाणे लग्नाला ' legalized prostitution ' म्हणणारा व गर्भवती प्रेयसीला गर्भपाताचा कोरडा सल्ला देणारा बापू ( सायंकाळ ), यांसारखी विभिन्न मनोवृत्तीची पात्रे या कादंबऱ्यांमधून आपणांला भेटतात. ' म्हातारपण म्हणजे मरण ! एकेका अवयवाचं, एकेका शक्तीचं मरण ' हे ' सायंकाळ ' मधलं रिनी या

वृद्ध कुमारिकेचे वाक्य आणि रिंनीच्या आईचे–यमुनाबाईचे–जराजर्जर अवस्थेतील शारीरिक आणि मानसिक पंगुत्व आपणांला मानवी जीवनातील अगतिकतेचे भेदक दर्शन घडविते. भाव्यांच्या कादंबऱ्यांमधून प्रेमभावनेचे रेखीव चित्र जसे रंगविलेले आहे, तसेच रेखीव चित्र मानवाच्या दयनीय वृद्धावस्थेचेंही रंगविलेले आहे. ज्या लेखणीने भावे ' अंतराळ ' मधील कमलिनीचे चित्र रेखाटतात त्याच लेखणीने ते ' मागं वळून ' या कादंबरीतील, भोगाच्या न विझणाऱ्या आगीत भडकणाऱ्या क्रांती सारख्या तरुणीचेंही वर्णन करतात. ' शेवटचे दिवस ' या कादंबरीत वाढत्या वयाच्या जाणिवेच्या भाराखाली, मृत्युभयाच्या सावलीत येणारे मानवी अनुभव शब्दरूप केले आहेत व ते वाचनीय आहेत. ' पिंजरा ' या कादंबरीद्वारे, मुंबईच्या थिटे चाळीत राहणाऱ्या दिगंबरपंतांच्या दारिद्र्याने उद्ध्वस्त झालेल्या कौटुंबिक जीवनाचे चित्रण करता करता मनुष्याने निर्माण केलेल्या विद्रूप जगाचे जे दर्शन भावे घडवितात, ते अतिशय भीषण व अंगावर काटा उभे करणारे आहे. कर्तव्यपूर्ती करण्याच्या प्रयत्नात जीवनातली सुखस्वप्ने हरवून बसलेले पापभीरू पंत येथे आहेत. भोवतीचे ढासळणारे जग सावरणे आपणांला शक्य नाही हे लक्षात येताच त्यांचा तोल जातो. ' Life has cheated me very badly ' या शब्दांत आपली जीवघेणी व्यथा जुगारी वसंतरावां-जवळ व्यक्त करून आयुष्यात प्रथमच ते व्हिस्की घेतात व ' I want to be more happy ' म्हणत एका अड्ड्यावत कुंटणखान्यात शिरतात. आयुष्यात प्रथमच पाप करायला निघालेल्या सात्त्विक स्वभावाच्या पंतांना तेथे सामोरी येते ती त्यांची मुलगी !—शेवटी चाळ कोसळून मातीच्या ढिगाऱ्याखाली सर्व चाळकरी मरण पावतात व मनुष्यानेच निर्मिलेल्या इहलोकीच्या नरकातून सर्व जीवांची सुटका होते ! मूल्यहीन असंस्कृत माणूस ' स्वतःचं जिणं विस्कारून पशुपक्ष्यांचंही जिणं छिन्नविच्छिन्न कर-णारा स्वार्थी प्राणी आहे ', असे जे वाक्य ' जादूचे पाणी ' या कादंबरीतील पशूच्या तोंडी भाव्यांनी घातले आहे ते अतिशय बोलके आहे. या कादंबऱ्या वाचताना भाव्यांच्या सामाजिक चिंतनाचे जे दर्शन घडते ते अतिशय प्रभावी वाटते.

भाव्यांचा लेखनप्रपंच इथेच थांबतो असे नाही. ' विषकन्या ', ' स्वामिनी ', ' महाराणी पद्मिनी ' यांसारखी त्यांची नाटके गाजली आहेत. ' देहापलीकडे जाणाऱ्या प्रेमाची ज्योत मनात पेटती ठेवून ' आत्मा वाचविण्यासाठी धडपडणारी पद्मिनी भाव्यांनी ज्या लेखणीने रंगविली आहे, त्याच लेखणीने जगन्नाथावर प्राणापलीकडे प्रेम करणाऱ्या अबोल काशीचे चित्रही ' स्वामिनी ' या नाटकातून त्यांनी रंगविले आहे.

भावे हे जीवनाचे भाष्यकार आहेत. मानवाच्या बऱ्यावाईट सर्व प्रवृत्तींचा आलेख त्यांनी आपल्या साहित्यातून उभा केला आहे. जीवनाचे स्वतःला झालेले दर्शन भावे आपल्या साहित्याद्वारे घडवितात व जीवनाच्या सर्व कंगोऱ्यांसह ते वाचकांच्या दृष्टीपुढे उभे करतात. वास्तविक भाव्यांची अशी एक निश्चित जीवनदृष्टी आहे व ती त्यांच्या

अनुक्रमणिका

लेखनामधून वारंवार डोकावतेही. परंतु ह्या जीवनदृष्टीच्या दडपणाखाली आपल्या लेखनाचे कलात्मक मूल्य उणावणार नाही याची दक्षता ते जाणीवपूर्वक घेतात. विचारसरणीने जीवनवादी असलेले भावे हाडाचे कलावंत आहेत. त्यांच्या सगळयाच लिखाणात एक प्रकारचा कैफ आहे...मनस्वीपणा आहे. एक देखणी धुंद . मस्ती आहे; आणि याचमुळे त्यांचे साहित्य उत्कट व मर्मस्पर्शी झाले आहे.

वाचकांचा जीवनानुभव समृद्ध करीत त्यांना अंतर्मुख बनविणे व तसे करतानाच त्यांना अलौकिक काव्यानंद प्राप्त करून देणे हे श्रेष्ठ साहित्याचे कार्य असते. हे कार्य प्रभावीपणे पार पाडण्याचे सामर्थ्य भावे-साहित्यात निश्चितच आहे. त्यामुळेच, मानवी मनाचा सतत शोध घेऊ पाहणाऱ्या त्यांच्या अम्लान प्रतिभावेलीवर फुलून आलेली ही साहित्यपुष्पे कधीही विशीर्ण होणार नाहीत; उलट आपल्या अलौकिक सुगंधाने कालपुरुषाच्या कठोर ओंजळीलाही ती सुगंधित करून सोडतील असा विश्वास वाटतो.

■

## साभार स्वीकार

### काव्य

**आढाव भिवराव जी एच :** संपा : आऽऽई; भि. एच. आढाव, औरंगाबाद; रु. ३/–

**उजगरे निरंजन :** नवे घर; निशिगंध प्रकाशन, नौपाडा, ठाणे; रु. १०/–

**कुलकर्णी सीता :** मधुचंद्रिका; चंद्रकिरण प्रकाशन, पुणे; रु. ७–५०

**कुलकर्णी सीता :** श्रीसंत कान्हूमहाराज कीर्तिसौरभ; डॉ. स. ना. कुलकर्णी, नातूबाग, पुणे २.

**जावळे पद्मावती :** मृदुली; सौ. मालती नेहेते, बुलढाणा; रु. ६/–

**देशपांडे रघुनाथ :** चरित्र शिवरायाचे; सौ. सुमन देशपांडे, करकंब; रु. ७–५०

**बडे शंकर :** इरवा : वऱ्हाडी साहित्य महामंडळ, दिग्रस; रु. १–६०

**महाजन नीळकंठ :** पहाट; सौ. कमल महाजन, जळगाव; रु. ८/–

**यशवंत :** रणदुर्गा झाशीवाली; सौ. नीराबाई य. पेंढरकर, पुणे ३०; रु. ६/–

**संगवई विजया :** ओंजळ; व्यंकटेश संगवई, देगलूर, नांदेड; रु. ३/–

**संपादक मंडळ :** कविता; मराठी साहित्य मंडळ, मोहोळ; रु. २–५०

**सोनवणे अशोक नीलकंठ :** नीलअंश; नी. तु. पाटील, जळगाव; रु. ८/–

२

# ‘ विश्ववाणी ’ची कहाणी

## सुरेश म. डोळके

‘ विश्ववाणी ’चा पहिला अंक विश्ववाणी मंडळातर्फे सप्टेंबर १९३२ मध्ये प्रसिद्ध झाला. श्री. के. ग. ताम्हणे व श्री. श्री. ना. नाजविले हे त्याचे चालक, आणि श्री. ब. गो. गर्गे व श्री. नी. द. भट हे त्याचे संपादक होते. दुसऱ्या वर्षाच्या प्रारंभापासून ( सप्टें. १९३३ ) संपादकद्वयातून श्री. नी. द. भट हे नाव गळले व त्यांच्या जागी श्री. य. वा. शास्त्री हे त्याचे संपादक झाले. गर्गे-शास्त्री या संपादकद्वयाने या द्वैमासिकाचे चार अंक काढल्यानंतर, प्रारंभापासून दीड वर्षानंतर, विश्ववाणी-मंडळाने ते ‘ मुलांच्या मासिका ’चे संपादक श्री. वा. रा. मोडक यांच्या स्वाधीन केले. श्री. मोडक यांनी या द्वैमासिकाचे मासिकात रूपान्तर केले व नव्या स्वरूपातला पहिला अंक जून १९३४ मध्ये प्रसिद्ध केला. मासिकाच्या रूपान्तरात संपादकांचेही स्थानान्तर झाले. श्री. मोडक हे संपादक आणि श्री. अनंत ओक व श्री. ना. वा. शास्त्री हे सहसंपादक झाले. चवथ्या वर्षाचा आठवा अंक मे १९३६ मध्ये निघाला. त्यानंतरचे अंक, निघाले असल्यास, माझ्या पाहण्यात आले नाहीत. १९३६ सालीच हे मासिक बंद पडले असावे.

### ‘ विश्ववाणी ’ का निघाले असावे ?

हे नियतकालिक का निघाले असावे ? वाढती वाङ्मयाभिरुची एवढेच याचे कारण म्हणता येईल का ? यापूर्वी तीन वर्षे ‘ वागीश्वरी ’ मासिक नागपूरला निघाले होते. त्याचा वाङ्मयीन दर्जा उच्च प्रतीचा होता. नागपूर प्रांतातील जुन्या-नव्या पिढीतले सर्व लेखक व कवी ‘ वागीश्वरी ’त अहमहमिकेने लेखन करीत असत.

असे असताही ‘ विश्ववाणी ’ हे नियतकालिक काढावे असे नागपूरच्या वाङ्मय-सेवेच्छू तरुणांना का वाटले ? याचे कारण ‘ वागीश्वरी ’च्या धोरणात असावे असे मला वाटते. केवळ हिंदू संस्कृतीचे पुनरुज्जीवन होईल अशाच स्वरूपाचे लेख प्रसिद्ध करणारे ‘ वागीश्वरी ’ हे मासिक या तरुणांना संकुचित दृष्टीचे वाटले असावे. संकुचितच नव्हे तर काहीसे कालबाह्यही ! देशकालपरिस्थिती लक्षात घेता, वाङ्मय आणि समाज यांत जगात जे निरनिराळे साहित्यिक आणि वैचारिक प्रवाह वाहत होते त्यांचा

अनुक्रमणिका

मराठी वाचकांना परिचय करून देण्यासाठी ' विश्ववाणी ' हे नियतकालिक जन्माला आले. मराठीला अन्य भाषांतील वाङ्मयाची व विचारांची आणि हिंदुस्थानबाहेरच्या देशांतील समाजांची ओळख करून देणे, हा ' विश्ववाणी 'चा हेतू होता.

' विश्ववाणी 'चे चालक व संपादक आपल्या विशिष्ट ध्येयाला अनुसरून कार्यप्रवृत्त झाले आहेत असे त्याच्या पहिल्या अंकापासूनच दिसते. या अंकात श्री. व. गो. गर्गे यांचा उर्दू काव्यावर, व ' विश्वद्रष्टा ' यांचा फ्रेंच लघुकथालेखक गी. द. मोपासां यांच्यावर लेख आहे. श्री. अ. ज. करंदीकर यांनी उमर खय्यामच्या काही रुबायांचे भाषांतर केले आहे. श्री. द. वा. शिदोरे यांचा ' आमच्या जातिभेदाचा प्रश्न ' हा, हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेत जातिभेदाचे स्थान काय, याची चर्चा करणारा अभ्यासपूर्ण लेखही ' विश्ववाणी 'च्या उद्दिष्टात बसू शकणारा आहे.

## जागतिक वाङ्मयाची व विचारांची ओळख

' हिंदी साहित्याचे विहङ्गमावलोकन ' हा श्री. दि. का. गर्दे यांनी लिहिलेला लेख ' विश्ववाणी'च्या सहाव्या अंकात ( जुलै १९३३ ) प्रसिद्ध झाला असून, हिंदी वाङ्मयाचा पूर्वप्रारंभिक कालापासून तो वर्तमानकालापर्यंत परिचय करून देणारा हा लेख अभ्यासपूर्ण आहे.

पाश्चात्त्य वाङ्मयातील साहित्यिकांचा व त्यांच्या साहित्याचा परिचय करून देणे हे ' विश्ववाणी'चे एक धोरण होते. त्यानुसार, फ्रेंच लघुकथालेखक ' गी. द. मोपासां ' हा ' विश्वद्रष्टा ' यांचा पहिल्याच अंकात प्रसिद्ध झालेला लेख वाचकांचे लक्ष आकर्षून घेतो. मोपासांच्या गुणावगुणांची, तत्त्वविचारांची व भाषाशैलीची या लेखावरून यथार्थ कल्पना येते. मोपासांच्या लघुकथांचा एक उत्कृष्ट उपोद्घात ठरेल इतका हा लेख महत्त्वपूर्ण आहे. ' गाल्सवर्दींचे स्ट्राइफ ' ( मार्च १९३३ ), ' डी. एच्. लॉरेन्स ' ( जुलै १९३३ ) व ' हार्डींची सृष्टी ' ( जाने. १९३४ ) हे श्री. माधव मनोहर यांचे आणि ' सर वॉल्टर स्कॉट ' हा प्रि. गो. चि. भाटे यांचा ( मे १९३३ )–हे सर्वच लेख त्या त्या साहित्यिकाच्या साहित्याचा परिचय करून देणारे व त्याच्या वाङ्मयीन श्रेष्ठत्वाचे मर्म उलगडून दाखविणारे आहेत. आय. के. फ्लेचर यांच्या लेखाच्या आधारे ' फिलिप थिकनिसी ' यांच्यावर ' वैनतेय ' यांनी लिहिलेला लेख ( ऑगस्ट १९३४ ) मात्र अगदीच सामान्य वाटतो.

## वैचारिक लेखन

' विश्ववाणी ' त प्रसिद्ध झालेल्या वैचारिक लेखनाचा विचार करू लागल्यास, डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी लिहिलेला ' हिंदुस्थान जित आणि पराभूत राष्ट्र आहे काय ? ' हा लेख ( ऑक्टो. १९३५ ) एकदम डोळ्यांसमोर येतो. या लेखात डॉक्टरसाहेबांनी

हिंदुस्थानला आलेले पारतंत्र्य तात्पुरते आहे,—त्यामुळे आपण जगातील एक अत्यंत यशस्वी साम्राज्य आहो आणि आपण आचरणात आणलेले राजकारण जगातील एक अत्यंत यशस्वी राजकारण आहे ही गोष्ट पुष्कळांस समजायची नाही, असे म्हटले आहे. हिंदुस्थान हे दलित राष्ट्र आहे असे मानण्याची डॉ. केतकरांची प्रवृत्ती नव्हती. आपण वारंवार जिंकलेले, त्यामुळे आपले शासनशास्त्र चुकीचे असले पाहिजे अशी जी अनेकांची समजूत होती, ती डॉक्टरसाहेबांना मान्य नाही. शासनशास्त्रच नव्हे तर आपले समाजशास्त्र व धर्मशास्त्रही जगात सर्वांत प्रगत होते आणि आहे, अशी डॉक्टर-साहेबांची धारणा दिसते. इतकेच नव्हे तर, ' पृथिवी समुद्रापर्यन्ताया एकराडिति ' या वचनात सांगितल्याप्रमाणे भारताची सर्व जगास ' एकराट् ' करण्याची क्रिया यशस्वी होऊ लागली आहे असे लवकरच दिसेल, असा विश्वासही डॉ. केतकर यांनी या लेखात व्यक्त केला आहे. ' इतिहासाची जी क्रिया चालली आहे त्या क्रियेचे खरे स्वरूप दहावीस वर्षांत उघड होत नाही, आणि सर्व जगाचा सामाजिक विकासाचा इतिहास लक्षात घेतल्याशिवाय चालू जगातील महत्त्वाच्या क्रिया नजरेस येणार नाहीत.' असे डॉ. केतकरांनी या लेखात म्हटले आहे. त्यात डॉक्टरसाहेबांनी हिंदुस्थानला पारतंत्र्य का आले याची मीमांसा केली नाही, हे खरे. पण, हा लेख वाचताच विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या देशाच्या तेव्हाच्या अवनत व परतंत्र आणि पूर्वीच्या उत्कर्षित व स्वतंत्र अवस्थेची जी मीमांसा केली आहे ती अभावितपणे आठवली; आणि भावनानिष्ठ गणल्या गेलेल्या चिपळूणकरांच्या व शास्त्रीय विचारसरणी असलेल्या समाजशास्त्रज्ञ डॉ. केतकरांच्या एतद्विषयक विचारांत कुठेतरी साम्य आहे, हे जाणवले.

' विश्ववाणी 'च्या पहिल्याच अंकात ' आमच्या जातिभेदाचा प्रश्न ' हा श्री. द. वा. शिदोरे यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. वैयक्तिक व जातिविषयक अन्याय्य मागण्या व अयोग्य सवलती मंजूर करावयाचे धोरण कसे चुकीचे आहे, त्याने मागणाराची भूक भागत नाही, उलट ती आणखी कशी वाढते; व आहे ती परिस्थिती अधिकाधिक विकट कशी होते याचे श्री. शिदोरे यांनी या लेखात उत्तम विवेचन केले आहे. ' स्वराज्यातील सूत्रचालक ' या श्री. स. ना. खेडेकर यांनी लिहिलेल्या लेखात ( नोव्हें. १९३२ ) स्वराज्यात लोकसभा हीच सार्वभौम असते व लोकसभेने नेमलेल्या सूत्रचालकांच्या हातांत सर्व विषय आले पाहिजेत, तरच ते स्वराज्य व तरच ते खरे सूत्रचालक, असा विचार मांडलेला आहे.

' विश्ववाणी 'त प्रसिद्ध झालेल्या वैचारिक लेखांत प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी लिहिलेल्या ' चालू काळाकडे लक्ष द्या ' या निबंधाचा ( नोव्हें. १९३३ ) उल्लेख केला पाहिजे. मला वाटते, ' प्रातःकाळ हा विशाल भूधर। सुंदर लेणी तयात खोदा। ' या केशवसुतांच्या ओळी प्रस्तुत लेखाला प्रेरक झाल्या असाव्यात. या लेखात प्रो.

बनहट्टींनी भूतकाळ व भविष्यकाळ यांच्यापेक्षा वर्तमानकाळाला अधिक महत्त्व दिले आहे, तोच अधिक कार्यप्रेरक असतो, व उन्नतिमंदिराचा पाया वर्तमानकाळाकडे लक्ष दिल्यानेच रचता येतो, असे प्रतिपादन केले आहे.

'मनस्यन्यत् वचस्यन्यत् कार्यमन्यत्...??' या नावाचा श्री. श्री. रा. टिकेकर यांचा लेख मार्च १९३६ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. लेखाचे स्वरूप ऐतिहासिक वाटते, पण तो आजच्या काळातही महाराष्ट्रीयांना विचारप्रवृत्त करणारा आहे. हिंदुस्थानात एकराष्ट्रीयत्वाची भावना अद्याप व्हावी तितकी जागृत झालेली नाही. एका प्रांतापुरते पाहिले तर त्यात तरी 'भावनिक ऐक्य' कुठे प्रस्थापित झाले आहे? याचे कारण काय असावे? भारतातील इतर प्रांतांपेक्षा महाराष्ट्र स्वतःला अनेक बाबतींत श्रेष्ठ समजतो. पण त्याने इतर प्रांतांशी आपुलकीने वागण्याचे किंवा तेथील लोकांशी मिसळण्याचे कितीसे प्रयत्न केले? सिंध, गुजरात, कर्नाटक इत्यादी प्रांतांतील लोक महाराष्ट्रीयांशी फटकून वागतात याला महाराष्ट्रीयच कारणीभूत आहेत, असे इतिहासावरून म्हणावेसे वाटते.

कै. हरी नारायण नेने हे महानुभाव संशोधक व शिक्षणशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध होते. व्यापारासारख्या विषयावर त्यांनी काही लिहिले असेल हे कुणाला सांगूनही खरे वाटणार नाही. पण त्यांनी 'व्यापारातील खरे रहस्य' हा लेख लिहिला आहे, व तो 'विश्ववाणी'च्या जाने. १९३४ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. या लेखात, व्यापारात यश मिळविण्यास काय करावे, कसे वागावे इ. बाबतींत हरिभाऊंनी बहुमोल सूचना केल्या आहेत. 'राखावी बहुतांचीं अंतरें। भाग्य येतें तदनंतरें' ही रामदासांची उक्ती परमार्थाप्रमाणे 'व्यापारी' प्रपंचातही लक्षात टेवण्यासारखी आहे खचित.

श्री. वा. मो. कानिटकर यांचे 'भावी मानव' (जाने. १९३३), 'चौथे परिमाण' (मार्च १९३३), व 'गगनाला गवसणी' (सप्टें. १९३३) हे लेख विश्ववाणीत प्रसिद्ध झाले आहेत. या सर्व लेखांतून लेखकांच्या वैज्ञानिक भूमिकेची साक्ष पटते व 'विश्ववाणी'ला वैज्ञानिक दृष्टिकोणाविषयी वाटणाऱ्या अगत्याचाही प्रत्यय येतो.

'सृष्टीची विकृत कल्पकता' हा एक सुंदर शैलीतला लालित्यपूर्ण निबंध 'विश्ववाणी'त (सप्टें. १९३३) प्रसिद्ध झाला आहे.—पुरुषाच्या स्तनयुगुलावर लिहिलेला! लेखावर लेखकाचे नाव, अर्थातच नाही. पण, तो कुणीतरी शैलीकार लेखकाने लिहिला असावा हे खचित. यात लेखकाने वैज्ञानिक दृष्टीचा आव आणला आहे, पण तो खरा आहे ललित निबंधच!

## इतिहास व ऐतिहासिक

'विश्ववाणी'त प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक लेखांत 'पोर्तुगीझांना ईश्वरी कृपेचा

प्रत्यय ' ( नोव्हें. १९३४ ), ' कवि कलश ' ( ऑक्टो. १९३५ ) व ' दक्षिणेचा यक्ष म्ह. ' सिंहगड ' ( मार्च १९३६ ) हे तीन लेख महत्त्वाचे आहेत. तीनही लेख रियासतकार सरदेसाई यांनी लिहिले आहेत. गोवा येथील दप्तरखान्यातील अधिकारी, सुप्रसिद्ध इतिहासकार प्रो. पांडुरंग पिसुर्लेकर यांनी पोर्तुगाल येथील संग्रह अभ्यासून पोर्तुगीझ-मराठे यांच्या संबंधाविषयी काही अस्सल कागदपत्र प्रसिद्ध केले होते. त्यांच्याच आधारे रियासतकारांनी ' पोर्तुगीझांना ईश्वरी कृपेचा प्रत्यय ' हा लेख लिहिला आहे. '

' कवि कलश ' या लेखात ' कलुषा कबजी ' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या ' कविजी कलश ' याच्या चरित्राचा ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करून, ' कलुषा बेइमान नव्हता ' असा निष्कर्ष सरदेसायांनी काढला आहे. सरदेसायांचा हा निष्कर्ष खरोखरीच फार महत्त्वाचा आहे.

इतिहासातील व्यक्तींकडे ऐतिहासिक दृष्टीनेच पाहिले पाहिजे—पूर्वग्रहांपासून व कल्पनेपासून सर्वथा अलिप्त राहून,—या दृष्टीने सरदेसायांचा हा लेख महत्त्वाचा वाटतो.

## वाङ्मयीन संशोधन

वाङ्मयीन संशोधनावर ' विश्ववाणी 'चा भर नव्हता. तरीही या क्षेत्रातले दोन महत्त्वाचे लेख विश्ववाणीत प्रसिद्ध झाले आहेत. एक श्री. वा. ना. देशपांडे यांचा ' एक अपूर्व प्राचीन गद्यग्रंथ ' ( जाने. १९३४ ) हा, आणि दुसरा श्री. ह. ना. नेने यांचा ' दासबोधातील एका महत्त्वाच्या ओवीवर नवीन प्रकाश ' ( जुलै १९३३ ) हा. श्री. देशपांडे यांनी या लेखात ' नागदेवाचार्यस्मृति ' या अप्रकाशित महानुभावीय ग्रंथाचा परिचय करून दिला आहे; आणि त्याचे स्वरूप व महत्त्व विशद केले आहे. हा ग्रंथ श्री. देशपांडे यांनी ' स्मृतिस्थळ ' या नावाने पुढे १९३९ साली विवेचक प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला. या लेखात श्री. देशपांडे यांनी, ' वृद्धाचार ' हा ग्रंथ नागदेवाचार्यस्मृती 'हून वेगळा मानण्यात येत असला तरी तो ' नागदेवाचार्यस्मृती 'चाच एक भाग असावा असा संशय व्यक्त केला आहे, व पुढील दोन प्रश्न उपस्थित केले आहेत :– ( १ ) ' अडीचशेची ' व ' साडेतीनशेची ' अशा या ग्रंथाच्या प्रती का निर्माण झाल्या ? ' व ( २ ) ' नागदेवाचार्यस्मृती 'चा कर्ता परशरामव्यासच होय, या म्हणण्याला ग्रंथांतरी आधार मिळतो काय ? श्री. देशपांडे यांचा हा लेख महानुभाव वाङ्मय-संशोधनाचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

श्री. नेने यांनी आपल्या लेखात ' सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु तेथ भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ' या दासबोधातल्या ओवीतील पाहिजे या शब्दाचा नवीनच अर्थ लावला आहे, व या ओवीच्या अर्थावर नवा प्रकाश टाकला आहे. ' पाहि-जे ' म्हणजे ' पाहिले जावे, लक्षात आणावे ' असा अर्थ श्री. नेने यांनी

केला आहे. ' येई-जे ', सांडि–जे ', ' सेवि–जे ' यांचे ' घ्यावा ', ' सांडावे ', ' सेवावे ' हे जसे विध्यर्थ होतात तसेच ' पाहि–जे ' याचा ' पाहावे ' हा अर्थही व्याकरणसंगत व तर्कसंगत ठरतो. येथे ' पाहिजे ' या शब्दाचा अन्वय कोणत्याही नामावर किंवा सर्वनामावर नाही, तसेच ते सहायक क्रियापदही नाही; तर ' पाह ' या धातूचे ते कर्मणिरूप आहे.

' महाराष्ट्र-काव्य-दीपिका ऊर्फ ओवी छंदाचे निर्वचन ' हा श्री. वा. ना. देशपांडे यांचा आणखी एक संशोधनात्मक लेख ' विश्ववाणी 'त प्रसिद्ध झाला आहे ( जून १९३५ ). या लेखात श्री. देशपांडे यांनी महानुभाववाङ्मयातील एक ओवीविषयक प्रकरण प्रथमतःच प्रकाशात आणले आहे. हा छन्दःशास्त्रीय पद्यप्रबंध लक्षधीर नावाच्या कवीने शके १५४४ च्या पूर्वी रचला असून, त्यात ओवीचे प्रकार किती होतात हे सांगितले आहे आणि त्यांची नावे व उदाहरणेही दिली आहेत.

' कर्ण डहारिया व त्याच्या दरबारचे कवी ' हा प्रो. वा. वि. मिराशी यांचा ( फेब्रु. १९३६, मार्च १९३६ ), आणि ' त्रिविक्रमभट्ट ' हा प्रो. वि. भि. कोलते यांचा ( जाने. १९३४ ) असे आणखी दोन संशोधनात्मक लेख ' विश्ववाणी 'त प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या लेखात प्रो. मिराशी यांनी, ' इंडियन अँटिक्वेरी 'त सर जॉर्ज ग्रिअर्सन यांनी कर्ण डहारिया याच्यासंबंधी दिलेली आख्यायिका कशी असंभवनीय आहे हे सिद्ध केले असून, दुसऱ्या लेखात प्रो. कोलते यांनी ' नलचम्पू 'कार त्रिविक्रमभट्ट याच्या स्थळाविषयी व कुळाविषयी माहिती दिली आहे.

## वाङ्मयविचार

नियतकालिकांतील वाङ्मयविचार प्रामुख्याने दोन प्रकारांनी व्यक्त होतो : एक पुस्तकपरीक्षणांच्या निमित्ताने, व दुसरा स्वतंत्र लेखांच्या रूपाने. या दोनही प्रकारचे लेखन ' विश्ववाणी 'त आले आहे. वस्तुतः स्वतंत्र लेखरूपाने वाङ्मयीन प्रश्नांचा विचार अधिक विस्ताराने व अधिक तात्त्विक स्वरूपात व्यक्त करता येतो. पण ' विश्ववाणी '-तला या बाबतीतील जो लेख एकदम डोळ्यांसमोर येतो तो पुस्तकपरीक्षणात्मक आहे. त्याचे नाव आहे ' हिंदोळ्यावर ', त्याचे लेखांक आहेत अकरा, आणि तो लिहिला आहे नागपूरचे जुन्या पिढीतील मार्मिक टीकाकार श्री. नारायण रंगनाथ अळेकर यांनी. ' विविधज्ञानविस्तारा 'त प्रसिद्ध झालेल्या अनेक प्रदीर्घ पुस्तकपरीक्षणांचा परिणाम होऊन त्या धर्तीवर अळेकरांनी ही लेखमाला ( ऑक्टो. ते मे १९३४, जुलै ते नोव्हें. १९३५ ) लिहिली असावी. विभावरी शिरूरकर यांच्या तेव्हा प्रसिद्ध झालेल्या ' हिंदोळ्यावर ' या भावकथेचे परीक्षण अळेकरांनी या लेखमालेत मोठ्या साक्षेपाने केले आहे. या भावकथेची नायिका अचला ही ' आर्य पत्नी ' आहे का, हे अळेकरांच्या परीक्षणाचे सूत्र आहे, व ती तशी नसल्याबद्दल त्यांनी लेखिकेवर कडाडून हल्ला केला आहे.

“ आपट्यांचा ‘ चंद्रगुप्त ’ ” हे प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी लिहिलेले दोन लेखांक ‘ विश्ववाणी ’त प्रसिद्ध झाले आहेत ( डिसे. १९३५, जाने. १९३६ ). हरिभाऊ आपट्यांच्या ‘ चंद्रगुप्त ’ या ऐतिहासिक कादंबरीचे इतिहासदृष्ट्या व आधारदृष्ट्या परीक्षण करण्याच्या दृष्टीने प्रो. बनहट्टींनी हे लेख लिहिलेले दिसतात. त्यांत या कादंबरीचा कलात्मक विचार मुळीच नाही.

कोणत्याही वाङ्मयीन नियतकालिकांत वाङ्मयविचार जसा पुस्तकपरीक्षणांच्या निमित्ताने, ग्रंथकारांच्या वाङ्मयीन ‘ अभ्यासां ’च्या ( Studies ) निमित्ताने, वाङ्मयीन सदरांच्या किंवा स्फुटांच्या निमित्ताने, तसाच स्वतंत्र लेखांच्याही रूपाने अभिव्यक्त होत असतो. स्वतंत्र लेखांच्या दृष्टीने विश्ववाणी ’कडे पाहू लागल्यास, श्री. पु. य. देशपांडे यांनी लिहिलेला ‘ साम्यवाद आणि वाङ्मय ’ हा लेख ( मार्च १९३४ ) नजरेत भरतो. श्रमजीवींच्या जीवनकलहाशी समरस होऊन निर्माण झालेले वाङ्मय हेच सर्वश्रेष्ठ होय, अशी भूमिका श्री. देशपांडे यांनी या लेखात मांडली आहे.

प्रो. भ. श्री. पंडित यांचे ‘ प्रतिभा व व्यासंग ’ ( सप्टें. १९३४ ), आणि ‘ भावना व भाषा ’ ( मे १९३५ ) हे दोन लेख ‘ विश्ववाणी ’त प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या लेखात प्रो. पंडितांनी प्रज्ञा व प्रतिभा यांचा परस्परसंबंध काय हे सांगून, व्यासंगानेच प्रतिभा कशी फुलते हे निरनिराळी उदाहरणे देऊन सिद्ध केले आहे. दुसऱ्या लेखात त्यांनी भाव आणि भाषा यांच्या अद्वैताविषयी तात्त्विक चर्चा केली आहे.

‘ कला व नीती ’ हा श्री. व. गो गर्गे यांचा ( मार्च १९३३ ), ‘ नीतिनिरपेक्ष कलेचे अस्तित्व असू शकते काय ? ’ हा श्री. चिंतामण बळवंत लेले यांचा ( एप्रिल १९३६ ), ‘ वाङ्मय आणि राष्ट्रीयत्व ’ हा श्री. अ. बा. ओक यांचा ( मे १९३६ )– याही लेखांचा या संदर्भात उल्लेख केला पाहिजे. साहित्याचा कलेशी, कलेचा नीतीशी, वाङ्मयाचा राष्ट्रीयत्वाशी संबंध काय वगैरे प्रश्नांची थोडीफार चर्चा लेखकांनी या लेखांत केली आहे. वाङ्मयीन प्रश्नोपप्रश्नांकडे पाहण्याची जागरूकता व त्यांची चर्चा करण्याचा उत्साह या प्रवृत्ती या लेखांत प्रतिबिंबित झालेल्या आहेत.

मान्यवर ग्रंथकारांच्या कृतींच्या ‘ अभ्यासा ’तूनही ( Studies ) थोडाफार साहित्यविचार व्यक्त होऊ शकतो. या दृष्टीने ‘ विश्ववाणी ’त प्रसिद्ध झालेल्या श्री. ना. मो. मोघे यांच्या ‘ खाडिलकरांची स्त्री-सृष्टी ’ ( जाने. १९३३ ), प्रो. भ. श्री. पंडित यांच्या ‘ कविवर्य तांबे यांचे काव्यविषय ’ ( नोव्हें. १९३३ ), श्री. ना. बा. शास्त्री यांच्या ‘ कवी यशवंतांची स्फुटगीते ’ ( जुलै १९३४, सप्टें. १९३४ ), श्री. आनंदराव जोशी यांच्या ‘ हरिभाऊ आपट्यांचे चरित्र ’ ( मे १९३३ ) इत्यादी लेखांचा उल्लेख केला पाहिजे. प्रो. पंडितांनी आपल्या या लेखात तांब्यांच्या काव्यविषयांचे विवेचन करीत असताना ‘ भावगीत ’ व ‘ नाट्यगीत ’ या काव्यप्रकारांची थोडी चर्चा केली आहे,

आणि कवी व तत्त्ववेत्ता यांच्या भूमिकेतील फरकही विशद करून सांगितला आहे. श्री. ना. वा. शास्त्री यांनी आपल्या लेखात यशवंतांच्या भावगीतांची वैशिष्ट्ये कोणती हे सांगितले आहे, आणि त्याबरोबर, रविकिरणमंडळाने काव्यसृष्टीत काय कार्य केले याचेही दिग्दर्शन केले आहे.

१९३२ ते १९३६ या काळात निर्माण झालेल्या 'फुलवात', 'बन्दिशाळा', 'चांदरात', 'जय-मङ्गला', 'पिचलेला पावा', 'रानफुले', 'स्वप्नरंजन', 'यशोगन्ध', 'जीवनकला', 'दवबिंदू', 'वळवांचे पाऊस', 'पुनर्भेट (भाग २ रा)', 'कल्प-वृक्षांच्या छायेत', 'मोत्यांची कुडी', 'दीपकळी', 'पिकली पाने', 'शिंपले आणि मोती', 'भंगलेले देऊळ', 'विरलेले वस्त्र', 'उघडझाप', 'ब्रम्हकुमारी', 'कोल्हट-करांचा लेखसंग्रह', 'शारदाश्रम वार्षिक', 'कालिदास', 'आद्य मराठी कवयित्री', 'कोल्हटकरांचे आत्मचरित्र', 'फुलोर' इत्यादी अनेक महत्त्वाच्या पुस्तकांवर 'विश्ववाणीत'त परीक्षणे प्रसिद्ध झाली आहेत. यांतील 'फुलवात' (नोव्हें. १९३२), 'चांदरात' (सप्टें. १९३३), 'पिंचलेला पावा' (ले. य. वा. शास्त्री, जाने. १९३४), 'भंगलेले देऊळ' (ना. वा. शास्त्री, फेब्रु. १९३५), व 'दीपकळी' (अ. वा. ओक, जाने. १९३६) ही पुस्तकपरीक्षणे महत्त्वाची वाटतात. महत्त्वाची या दृष्टीने की, परीक्षण-लेखकांनी त्या त्या वाङ्मयप्रकारांचे काही निकष आधी निश्चित केले आहेत व त्या निकषांच्या आधारावर त्या त्या पुस्तकाचे यशापयश ठरविले आहे. हे ठरविताना क्वचित काही ठिकाणी परीक्षणलेखकांनी त्या त्या वाङ्मयप्रकाराबद्दल किंवा लेखकाच्या प्रतिभेबद्दल स्वतंत्र विचारही व्यक्त केले आहेत.

वाङ्मयीन सदरे किंवा स्फुटे 'विश्ववाणी'त फारशी नाहीत, आणि त्यांतून वाङ्मय-विचारही म्हणण्यासारखा व्यक्त झाला नाही. वळवाच्या पावसाचा मधूनच शिडकाव व्हावा आणि त्याने वरचा पृष्ठभाग किंचित भिजावा,—असे स्वरूप विश्ववाणीतल्या सदरांतील व स्फुटांतील साहित्यविषयक विचारांचे आहे.

—'विश्ववाणी'तला साहित्यविचार असा आहे. एखाददुसरा लेख वगळल्यास त्यात साहित्यासंबंधी स्वतंत्र असा तत्त्वविचार नाही, साहित्यप्रकाराचे सखोल असे चिंतन नाही, किंवा साहित्यविषयक प्रश्नांची व्यासंगपूर्ण चर्चाही नाही.

## माडखोलकरांचे सुंदर वाङ्मयीन निबंध

पण, हे नसले तरी एका बाबतीत मात्र 'विश्ववाणी'ने पहिल्या प्रतीचे कार्य केले आहे. ही बाब म्हणजे माडखोलकरांचे 'मेघदूतातील कलाविलास' (ऑक्टो. १९३४) व 'उर्वशी' (एप्रिल १९३५) हे दोन सुंदर वाङ्मयीन निबंध त्यांच्याकडून लिहवून घेऊन 'विश्ववाणी'ने प्रसिद्ध केले, ही! माडखोलकरांचे हे दोनही निबंध उत्कृष्ट आहेत हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. त्यांत त्यांची संस्कृत वाङ्मयाविषयीची

अभिरुची दिसते, त्यांच्या रसिकतेचा प्रत्यय येतो आणि त्यांच्या कमनीय भाषा-शैलीचीही साक्ष पटते. ‘ विश्ववाणी ’ ने मराठी साहित्याला काय दिले हा प्रश्न वेगळा; पण तिने मराठी साहित्याला या दोन निबंधांची देणगी दिली हे मात्र निर्विवाद !

## श्रीपाद कृष्णांची शेवटली कथा

अशीच आणखी एक बहुमोल गोष्ट ‘ विश्ववाणी ’ ने केली आहे. ती म्हणजे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या ‘ चोरच्या चोर आणि वर—’ या कथेचे प्रसिद्धीकरण ( मार्च १९३४ ). श्रीपाद कृष्णांनी लिहिलेली ही शेवटची कथा होय. यानंतर त्यांनी कथालेखन केले नाही. या कथेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, ‘ सुदाम्याचे पोहे ’ च्या संदर्भात पांडुतात्या व बंडुनाना असलेली ही कथा महत्त्वाची आहे. त्या वेळी श्रीपाद कृष्णांचा मुक्काम नागपूरला होता व ‘ विश्ववाणी ’ चे एक संपादक श्री. य. वा. शास्त्री यांनी श्रीपाद कृष्णांकडून ही कथा लिहवून घेतली होती. ( श्री. गं. दे. खानोलकर यांनी लिहिलेल्या ‘ साहित्यसिंह ’ या श्रीपाद कृष्णांवरील ग्रंथात प्रस्तुत कथेचा कुठेही उल्लेख नाही. )

## काव्यप्रकार, छन्दःशास्त्र

काव्यप्रकारांची माहिती देणारा ‘ कोपकाव्य ’ हा श्री. वा. ना. देशपांडे यांचा लेख ( फेब्रु. १९३६ ), व छन्दःशास्त्रीय स्वरूपाचा ‘ स्वैर पद्य ’ हा प्रो. माधवराव पटवर्धन यांचा लेख ( ऑक्टो. १९३५ ) ‘ विश्ववाणी ’त प्रसिद्ध झाला आहे. विश्वनाथाच्या ‘ साहित्यदर्पणा ’त कोपकाव्याचे ‘ कोषः श्लोकसमूहस्तु स्यादन्योन्यान-पेक्षकः ’ असे लक्षण दिले आहे. या जातीच्या संस्कृत काव्यांत अमरुकवीचे ‘ अमरुशतक ’ व जगन्नाथपंडितांचा ‘ भागिनीविलास ’, महाराष्ट्रातील ‘ गाथासप्तशती ’ आणि प्राचीन हिंदीतील ‘ सतसई ’ यांचा अंतर्भाव होतो. रचनाविशेषावरून वामन-पंडितांच्या ‘ नीतिशतका ’स - ‘ कोपकाव्य ’ हे अभिधान देणे फारसे चुकीचे होणार नाही असे श्री. देशपांडे यांनी या लेखात म्हटले आहे. ‘ स्वैर पद्य ’ या लेखात, मुक्तपद्याचे वा स्वैरपद्याचे मराठीतील निरनिराळे प्रयोग पाहून जे विचार सुचले ते पटवर्धनांनी मांडले आहेत. मुक्तपद्याच्या अभावी प्रतिभेची कुचंबणा होते असे पटवर्धनांना वाटत नाही. दिखाऊ पद्य कृत्रिम असल्यामुळे त्याने स्वाभाविकपणाचा डांगोरा पिटून खपणार नाही, असेही पटवर्धनांनी या लेखात म्हटले आहे.

## लघुकथा, लघुनिबंध व कविता

वि. स. खांडेकर, य. गो. जोशी, कुसुमावती देशपांडे, शं. वा. शास्त्री, लक्ष्मणराव सरदेसाई, जयवंतराव सरदेसाई या प्रथितयश कथाकारांबरोबरच, १९३० ते १९३५

या काळात कथालेखकांची जी पिढी पुढे आली त्यातील वामन चोरघडे, पु. भा. भावे, प्र. शां. मांजरेकर, व्यं. शं. वकील, व्यं. रा. वनमाली, कुमुदिनी प्रभावळकर, पिरोज आनंदकर, सां. घ. कंटक, 'सहृदय' प्रभृतींच्या आणि तेव्हा नवोदित असलेल्या य. वा. शास्त्री, भानुदास श्रीधर (प्रा. भा. श्री. परांजपे), द्वा. वा. घाटे, द. ग. प्रधान, श्री. के. बोबडे, अ. वा. ओक, ना. मो. मोघे प्रभृति कथाकारांच्या कथा 'विश्ववाणी'त प्रसिद्ध झाल्या आहेत. कुसुमावती देशपांडे यांची 'माया', वामन चोरघडे यांची 'ज्योत विझल्यावर—' किंवा य. वा. शास्त्री यांची 'लांब लांब सावल्या' या गाजलेल्या कथा 'विश्ववाणी'तच प्रसिद्ध झाल्या आहेत. सुप्रसिद्ध कवी आनंदराव टेकाडे हे कधीकाळी कथालेखन करीत होते याचा नमुना म्हणून 'माणसाची गोष्ट' या विश्ववाणीत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कथेकडे बोट दाखविता येते. 'शशिमोहन'कार या. मु. पाठक यांचीही एक कथा ('एक कपाट') विश्ववाणीत प्रसिद्ध झाली आहे.

'विश्ववाणी'त लघुनिबंध फारसे आले नाहीत. वि. स. खांडेकर, गो. रा. दोडके यांचे काही लघुनिबंध विश्ववाणीत प्रसिद्ध झाले आहेत, तेवढेच! निबंध–तंत्राचा एक नमुना म्हणून 'पुरुषोत्तम' यांच्या 'कैफियत' या कथा–निबंधाचा (जाने. १९३३) उल्लेख करता येईल.

'विश्ववाणी'ची काव्य-वाटिका मात्र बहरलेली आहे. भा. रा. तांबे, श्री. रा. बोबडे ज. के. उपाध्ये, आनंदराव टेकाडे, ना. के बेहेरे, यशवंत, आ. रा. देशपांडे, बा. ना. देशपांडे, ना. घ. देशपांडे, कुसुमाग्रज, भ. श्री. पंडित, गु. ह. देशपांडे, अनंत काणेकर, व्यं शं. वकील, वा. भा. पाठक, पु. य. देशपांडे, संजीवनी मराठे, राजा बढे, ना. मा. सरपटवार, मनोरमाबाई नावलेकर प्रभृति जुन्या-नव्या पिढीतील अनेक कवींनी 'विश्ववाणी'चा काव्यकुंज फुलविला आहे. विश्ववाणीतील हौशी कवींत य. वा. शास्त्री, व्यंकटेश पंडित, शांतादेवी परदेशी, द. वा. वाचासुंदर, ना. वा. शास्त्री, द. ग. जयवंत प्रभृतींचा उल्लेख करावा लागतो. राजा बढे यांनी गोल्डस्मिथच्या 'Deserted village' या काव्याचे 'निर्वासित ग्राम' या नावाने केलेले भाषांतर विश्ववाणी'च्या काही अंकांत प्रसिद्ध झाले आहे.

## समारोप : काही निष्कर्ष

'विश्ववाणी'चे आतापर्यंत जे समालोचन केले त्यावरून विश्ववाणीच्या वाङ्मयीन कार्याबद्दल पुढील काही निष्कर्ष फलित होतात :–

(१) १९३० ते १९३५ या काळात महाराष्ट्रात साहित्यिकांची नवी पिढी उदयास येत होती. त्यांच्या स्फुरणशील साहित्याचे नवनवीन उन्मेष अभिव्यक्त होण्यासाठी अनेक नियतकालिके जन्मास आली. 'विश्ववाणी' हे त्यांपैकीच एक.

अनुक्रमणिका

( २ ) ' वागीश्वरी ' हे अव्वल दर्जाचे मासिक नागपूरला आधीच जन्माला आले होते मराठीतील वाङ्मयीन नियतकालिकांच्या जगात स्वतःचे स्वतंत्र आणि मानाचे स्थानही ' वागीश्वरी 'ने निर्माण केले होते; आणि तरीही ' विश्ववाणी ' निघाले. याचे कारण ' वागीश्वरी'च्या भूमिकेची प्रतिक्रिया असावी, असे मला वाटते. ' वागीश्वरी 'च्या हिंदुसंस्कृतिनिष्ठ भूमिकेच्या प्रतिक्रियेतून ' विश्ववाणी ' जन्मास आले असावे.

( ३ ) ' विश्ववाणी 'चे ध्येय उदात्त व कालोचित होते व ' विश्ववाणी 'च्या निर्मात्यांच्या हातांत जोपर्यंत हे नियतकालिक होते तोपर्यंत त्यांनी हे ध्येयनिष्ठेने व प्रयत्नपूर्वक पार पाडले.

( ४ ) लक्षात राहते विश्ववाणी'च्या निर्मात्यांची जिद्द, त्यांची विशिष्ट भूमिका व तेव्हा नागपुरात निर्माण झालेली वाढती वाङ्मयाभिरुची.

( ५ ) ' विश्ववाणी'त वैचारिक, ऐतिहासिक, वाङ्मयसंशोधनात्मक, समीक्षणात्मक, ललित—असे सर्वच प्रकारचे साहित्य प्रकाशित झाले. पण काही अपवाद वगळल्यास-आणि असे अपवाद निश्चितच आहेत—' विश्ववाणी 'चा एकंदरीत दर्जा व त्याचे स्थान दुय्यम होते, असेच म्हणावे लागते.

( ६ ) माडखोलकरांचे ' मेघदूतातील कलाविलास ' व ' उर्वशी ' हे वाङ्मयीन निबंध म्हणजे ' विश्ववाणी 'ने मराठीला दिलेली देणगी आहे.

( ७ ) श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची शेवटली लघुकथा मिळवून व प्रसिद्ध करून ' विश्ववाणी 'ने वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मयीन कामगिरी केली आहे.

( ८ ) नागपूरच्या तेव्हाच्या वाङ्मयीन नियतकालिकांच्या वितानात ' विश्ववाणी ' ला चंद्राचे स्थान नाही, पण लुकलुकणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण तारकेचे स्थान व महत्त्व मात्र निश्चितच आहे.

■

## साभार स्वीकार

### नाटक

**परांजपे सई :** जास्वंदी; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; रु. ५/–
**सबनीस वसंत :** घरोघरी हीच बोंब; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; रु. ५/–
**सावंत शिवाजी :** मृत्युंजय; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; रु. ५/–
**हलदुले श्रीकांत :** तो स्वप्नपक्षी; मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; रु. ५/–

३

# एक वाङ्मयीन 'छंद'

रा. भि. जोशी

'छंद' या द्वैमासिकाचा पहिला अंक सप्टेंबर–ऑक्टोबर १९५४ मध्ये प्रसिद्ध झाला; आणि शेवटला जुलै–ऑगस्ट १९६० मध्ये. असे एकूण सहा वर्षे 'छंद'चे आयुष्य होते. भाषा, साहित्य आणि ललितकला ह्यांच्यापुरते 'छंद'ने आपले कार्य-क्षेत्र मर्यादित करून घेतले होते. अशी नियतकालिके पूर्वी निघाली होती; आणि काही काळ चालून बंद पडली होती.

ही नियतकालिके बंद का पडली हे 'छंद' काढणाऱ्यांना माहीत होते. तरीही त्यांनी 'छंद' काढण्याचे ठरवले. आपण हे का करीत आहो, हे 'छंद'च्या पहिल्या अंकातच संपादकीय निवेदनात सांगितले आहे.

'छंद'ने आपल्यापुढे ठेवलेले उद्देश ह्या निवेदनातच सांगितले आहेत. ते पुढीलप्रमाणे आहेत :—

(१) नव्या लेखकांच्या वैशिष्ट्यपूर्ण लेखनाला अवसर देणे.
(२) त्यांच्या प्रयत्नांची दिशा समजावून घेणे–देणे.
(३) त्या प्रयत्नांचे मूल्यमापन करणे.
(४) वाङ्मयातील प्रभावी विचारसरणींचा परामर्श घेणे.
(५) इतर ललितकलांसंबंधी चर्चा करणे; व त्यांचे स्वरूप समजावून घेणे.
(६) परभाषांतल्या भारतीय व इतर ललित कलाकृतींचा परिचय करून देणे.
(७) वाङ्मय–विवेचनात्मक लेखांचे अनुवाद प्रसिद्ध करणे.

आपल्या सहा वर्षांच्या जीवनावधीत 'छंद'ने हे सगळे उद्देश साधण्याचे यथाशक्ति प्रयत्न केले, ही गोष्ट सहाही वर्षांचे अंक एकत्रितपणे पाहिले म्हणजे सिद्ध होते.

'छंद' काढण्याची कल्पना नेमकी केव्हा निघाली हे सांगणे कठीण आहे. १९५३ च्या जानेवारीत लोणावळे आणि १९५४ च्या जानेवारीत खंडाळे अशा दोन ठिकाणी पु. शि. रेगे ह्यांच्या पुढाकाराने काही समानशील मंडळी दोन–तीन दिवसांच्या स्नेह-संमेलनासाठी जमली होती. त्या दोनही संमेलनांत साहित्यासंबंधी आणि इतर अनेक विषयांसंबंधी मनसोक्त आणि मोकळ्या गप्पा–चर्चा झाल्या. त्यांतूनच केव्हातरी ही कल्पना निघाली असावी. पण प्रत्यक्षपणे 'छंद' काढण्यापूर्वी काही दिवस पु. शि. रेगे

अनुक्रमणिका

ह्यांच्या घरी एक छोटीशी बैठक झाली. तिला स्वतः पु. शि. रेगे, वा. ल. कुलकर्णी, डॉ. गं. व. ग्रामोपाध्ये, द. ग. गोडसे आणि रा. भि. जोशी हजर होते. त्या बैठकीत ' छंद ' हे नाव आणि ते द्वैमासिक म्हणून प्रसिद्ध करण्याचा विचार ही दोन्ही पक्की झाली. ' छंद 'च्या संपादिका म्हणून सौ. सरिता रेगे ह्यांचे नाव ' छंद 'वर येत असले तरी ते काही तांत्रिक कारणाकरिता येत होते हे सर्वांना न सांगता माहिती होते. ' छंद 'चा पत्रव्यवहाराचा पत्ता पु. शि. रेग्यांच्या राहत्या घराचा होता. ' छंद 'चे संपादकीय काम पु. शि. रेगे, वा. ल. कुळकर्णी, गं. व. ग्रामोपाध्ये, द. ग. गोडसे आणि रा. भि. जोशी हे संयुक्तपणे करीत होते. कामाची वाटणी अशी झालेली नव्हती. जसे जे काम ज्याच्याने होण्यासारखे असेल ते त्याने करायचे अशीच पद्धती होती. ' छंद 'चे स्थूल स्वरूप ठरलेले असले तरी प्रत्येक अंकाचा मजकूर ठरवणे, त्यासाठी लेखकांशी पत्रव्यवहार करणे, आलेल्या लेखांतून निवड करणे, या आणि अशा कामांसाठी संपादकांच्या वारंवार भेटी होत असत. आलेल्या मजकुरावर चर्चा होत असे. हा मजकूर हवा तसा आलेला नसला तर संपादकांपैकी कोणी काही लिहावे की, इतर कोणाकडून पत्र पाठवून लेख मागवावा हे ठरत असे. बाहेरचा पत्रव्यवहार सगळा पु.शि.रेगे करीत असत. कला आणि साहित्य ह्यासंबंधीचा दृष्टिकोण आणि अभिरुची सर्वांची सामान्यतः सारखीच असल्यामुळे चर्चा खूप झाल्या तरी काम सगळे एकमताने होत होते. त्यात कधी तीव्र मतभेद निर्माण झाले नाहीत. पुष्कळदा अशा चर्चांच्या वेळी मुंबईची आणि बाहेरगावची इतर मित्र–मंडळीही असत, आणि त्यातून नवनव्या कल्पना, नवनवे विषय सुचत. ह्या चर्चा म्हणजे ' छंद 'च्या कार्याला प्रोत्साहन असे.

' छंद 'ला जुन्या-नव्या लेखकांचे चांगले साहाय्य मिळाले. पण पुष्कळ चांगले लेख आलेले आहेत, निवड करायला भरपूर वाव आहे असे कधी झाले नाही. लेखकांना त्यांच्या लेखनाचा मोबदला दिला पाहिजे, हे संपादकांना मान्य असूनसुद्धा ' छंद ' ला लेखकांना कोणताही मोबदला देता आला नाही; पण मोबदला नाही म्हणून ' छंद ' ला लेख मिळाले नाहीत असे झाले नाही. ज्यांना इतरत्र चांगला मोबदला मिळत होता, त्यांनीही ' छंद ' साठी आपलेपणाने लेखन केले आणि नव्या तरुण लेखकांनी तर उत्साहाने केले.

कोणतेही नियतकालिक चालवायचे तर ते चालवणाऱ्यांना वेळेवर ज्यांच्याकडून आपल्याला हवे तसे लेखन मिळेल अशा लेखकांचा एक संच आपल्याभोवती गोळा करावा लागतो. ही गोष्ट ' विविधज्ञानविस्तारा 'पासून आजतागायतच्या कोणत्याही अशा प्रकारच्या नियतकालिकांतल्या लेखकांच्या यादीकडे पाहिले तर दिसून येईल. ह्यालाच काही लोक गटबाजी म्हणतात; आणि अशा ' गटबाजी 'चा आरोप पूर्वीच्या नियतकालिकांप्रमाणेच ' छंद ' वरही प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे करण्यात येत असे. पण ' छंद ' मध्ये लेखन करणाऱ्यांत जशी काही नावे पुन्हा-पुन्हा दिसतात तशी नवीनवी

नावेही दिसतात. ह्या नव्या नावांची संख्या काही कमी नाही. खरे असे आहे की, लेखकांचा गट असतो, 'गट्याजी' नसते. एक गोष्ट उघड आहे की, कोणत्याही नियतकालिकाच्या चालकांना चांगले लेखन करणारे नवे लेखक हवेच असतात. ज्यांत काही विशेष गुण आहे असे लेख नव्या लेखकांकडून आले तर ते स्वीकारायला चालक उत्सुक असतात, कारण त्यामुळे नवीन लेखकांना जसे प्रोत्साहन मिळते तसे नियतकालिकांच्या चालकांना नवे लेखक पुढे आणल्याचे श्रेय मिळते. 'छंद' मध्ये अशा काही नवीन लेखकांचे लेखन आलेले दिसेल. असे लेखन अधिकाधिक प्रमाणात आले असते तर ते संपादकांना हवेच होते. कारण त्यामुळे मजकूर पुरवण्याचा त्यांच्यावरचा भार कमी झाला असता.

'छंद' मध्ये जो संपादकीय मजकूर येत असे तो जरी कोणीतरी एकजण लिहीत असला, तरी काय आणि कसे लिहायचे ते संपादकमंडळात चर्चा होऊन सर्वानुमते ठरत असे. ह्याचे उत्तम आणि ठसठशीत उदाहरण म्हणजे 'मौज'—(दिवाळी) मधल्या के. नारायण काळ्यांच्या लेखाला उत्तर देण्याच्या निमित्ताने महाराष्ट्राच्या प्राचीन कलाकर्तृत्वासंबंधी 'छंद' मध्ये प्रसिद्ध झालेले प्रदीर्घ लेख. ह्या लेखांवर लेखकाचे नाव नसल्याबद्दल श्री. काळ्यांनी तक्रार केली; पण ते लेख कोणा एकाचे नव्हतेच ! ते संपादकीय लेख होते.

'छंद'ने सहा वर्षांत मराठी वाचकाला काय दिले, असा प्रश्न विचारला तर एक गोष्ट निश्चितपणे सांगता येईल की, भाषा, कला आणि साहित्य ह्यांविषयी आस्था बाळगणाऱ्यांच्या विचारांना प्रेरणा देईल, त्यांच्या जाणिवेचे क्षितिज अधिक संपन्न करील असे पुष्कळच साहित्य 'छंद' ने सहा वर्षांत दिले. 'छंद ने आपल्यापुढे जे उद्देश ठेवले होते ते साधण्याच्या प्रयत्नात शैथिल्य येऊ नये, तसेच लेखनगुणांची पातळी खालीही जाऊ नये ह्यासाठी 'छंद'ने जागरूकता बाळगली व मजकुरात विविधता राखण्याचाही प्रयत्न केला. नव्या लेखकांचे लेखन 'छंद'ने प्रसिद्ध केले. हिंदी, उर्दू, गुजराती आणि काही युरोपियन भाषांतल्या कथांचे अनुवाद प्रसिद्ध केले. लहानमोठी पुस्तक–परीक्षणे 'छंद'च्या अंकांत सातत्याने आली. साहित्य–कला-विषयक प्रश्नांवर लेख आले. 'छंद'मधील टिपणे आणि आणि पत्रे तर आजही ताजी वाटतील. 'छंद'मधून संगीतावर अरविंद मंगरूळकर, वामनराव देशपांडे, स. ह. देशपांडे, रोहिणी भाटे, लीला अर्जुनवाडकर, चैतन्य देसाई इत्यादींचे जे लेखन आले, त्याने संगीतविषयक आणि साहित्यविषयक विचारांना चालना दिली. चित्रशिल्पावर स्वतंत्रपणे लेख आले नाहीत; पण महाराष्ट्रातल्या प्राचीन कलाकर्तृत्वासंबंधीच्या प्रदीर्घ संपादकीय लेखनाचा तर वर उल्लेख आलाच आहे. प्राचीन भारतीय नाट्यगृहा-संबंधीचा प्रा. ग. त्र्यं. देशपांडे ह्यांचा चित्रयुक्त लेख आणि त्यांच्या टीपांसहित क्रमशः प्रसिद्ध झालेला 'स्पंदकारिका' हा काश्मिरी शैवागमातील प्राचीन ग्रंथ, तसेच

' डायोजिनिस ' नियतकालिकातल्या ' द बायॉलजी ऑफ आर्ट ' ह्या बाइडलीच्या इंग्रजी निबंधाचा ' छंद 'मध्ये प्रसिद्ध झालेला ' कलेचे जीवशास्त्र ' हा मराठी अनुवाद हे ' छंद 'ने आपल्यापुढे ठेवलेल्या उद्देशांच्या साधनेचे महत्त्वाचे प्रयत्न म्हणता येतील.

विविध प्रकारचे लेखन प्रकाशित करण्याबरोबरच तरुण अभ्यासकांना उत्तेजन म्हणून ' छंद 'ने बक्षिसासाठी निबंध मागवण्याची योजनाही आखली. या योजनेनुसार ' प्रो. ना. सी. फडके ह्यांच्या कादंबऱ्या ', ' भा. वि. वरेरकर ह्यांची नाटके ',' चिंतनपर दीर्घ कविता ', ' मराठीतील गेल्या पंचवीस वर्षांतील वाङ्मयविचारांची दिशा ' अशा विषयांवर लेखन मागवले. पहिल्या विषयावर आलेले निबंध सोडले तर इतर विषयांवर समाधानकारक लेखन आले नाही. पण ' छंद 'ने केलेला उपक्रम स्वागतार्ह होता.

' छंद ' बंद पडले याचे वाईट अर्थातच वाटते. पण शेवटच्या अंकापर्यंत ' छंद 'च्या कार्यात शिथिलता आली नव्हती, अनियमितपणा नव्हता; आणि कला, भाषा व साहित्य यांविषयीचा संचालकांचा उत्साह ओसरला नव्हता. परिस्थितीमुळेच ' छंद 'चे प्रकाशन स्थगित करणे भाग पडले. ' छंद ' बंद पडले; पण त्याने वाचकांच्या मनावर उमटवलेला ठसा पुसला गेला नाही. तो ठसा पुसला जाणार नाही असे कार्य ' छंद 'ने सहा वर्षांत केले. ■

## कथेची कसोटी

नवकथेनं कथा व्यापक केली, सूक्ष्म केली, नवीन घाट दिला, नवीन साचा दिला, कथेचं ' स्फिअर ' मोठं केलं. कितीतरी सूक्ष्म, तरल असे अनुभव व्यक्त करणारा नवा घाट दिला. विषय–तंत्राचे साचे मोडले...नवकथा ' ॲट् इट्स बेस्ट ' असताना हे घडलं आहे; आणि ते चांगलं आहे.

पण पुढे दुर्बोधता, नीरसता, बीभत्सता हेच परिमाण मानण्यात येऊ लागलं, तेव्हा मात्र मला ' संबंध नको ' असं वाटू लागलं. मी ती ' डिसोन ' केली. नवकथा ही अखेर प्रचंड कथा–वृक्षाची शाखा आहे. ते एक दालन आहे. पण मग तीत दोष शिरले. ' फ्लॅट ', ' स्टॅटिक ' असं आता हे प्रकरण झालं आहे. पण त्या दोषांचाच गौरव सुरू झाला. कथेला आदी, मध्य, अंत हवा. ती ' इन्टरेस्टिंग ' असली पाहिजे. ' इमोशनल इन्टिग्रिटी ' तीत हवी. ' युनिफॉर्मिटी ऑफ इम्प्रेशन ' हवी. काही ' टार्गेट ' हवं. पण ते गेलं; आणि नीरसता वाढली. रस नकोच ही भूमिका आली. त्याला माझी मान्यता नव्हती. प्रयोगाकडं सहानुभूतीनं पाहायला हवं हे खरं. पण प्रत्येक प्रयोगालाही अखेर काही परीक्षा द्यावी लागतेच. साधुसंतांनाही ती परीक्षा चुकली नाही. नवकथेलाही परीक्षा चुकली नाही. चुकणार नाही. पु. भा. भावे

( ' कथा सृजनाची '—प्रभाकर अत्रे, सोमैया मुंबई, १९७०, पृ. १४–१५ )

४

# ‘साहित्य’चे वाङ्मयीन वैभव

सुमेधा विलास कुलकर्णी

‘साहित्य’ या नावावरूनच या नियतकालिकाच्या स्वरूपासंबंधीची जी एक स्थूल रूपरेषा आपल्या मनात येते, तिला अनुसरूनच या द्वैमासिकाचे स्वरूप आहे. साहित्याशी संबंधित असणाऱ्या विविध घडामोडींची दखल, साहित्यातील विविध वाङ्मयप्रकारांचे नमुने व त्यांच्या स्वरूपाची चर्चा, साहित्यातील नूतन प्रेरणांचे स्वागत व अपप्रवृत्तींचा निषेध असे सर्वस्वी साहित्याच्या विकासाला वाहिलेले नियतकालिक म्हणून ‘साहित्य’ या द्वैमासिकाचा निर्देश करावा लागेल. या द्वैमासिकाला असे शुद्ध वाङ्मयीन स्वरूप प्राप्त होण्यामागे मुंबईकर साहित्यप्रेमी लेखकांनी एकत्र येऊन स्थापलेल्या ‘मुंबई मराठी साहित्य संघ’ या संस्थेची प्रेरणा कारणीभूत आहे. साहित्यविषयक व नाट्यविषयक हरएक घटनांशी जिव्हाळ्याने संबंधित असणाऱ्या या संस्थेचे ‘साहित्य’ हे मुखपत्र असल्यामुळे या संस्थेच्या कार्यकर्त्या सभासदांच्या एकूण ध्येयधोरणांची छाप त्यावर पडणे अगदी स्वाभाविक होते.

२१ जुलै १९३५ रोजी ‘मुंबई मराठी साहित्य संघा’ची स्थापना झाली. वाङ्मयाला वाहिलेले नियतकालिक प्रसिद्ध करण्याचा संघाचा उद्देश प्रथमपासूनच होता. त्यानुसार संघाचे मुखपत्र या स्वरूपात ‘वीणा’ हे मासिक श्री. श्री. म. वर्दे यांच्या संपादनाखाली एप्रिल १९३७ पासून प्रसिद्ध व्हावयास सुरुवात झाली; पण दुसऱ्या वर्षातच ‘वीणे’ची इतिश्री झाली. तथापि या अनुभवाने खचून न जाता पुढेमागे एखादे वाङ्मयीन नियतकालिक काढण्याची कल्पना मात्र जिवंतच राहिली. तिचाच आविष्कार पुढे पाच सात वर्षांनी, म्हणजे जानेवारी १९४७ मध्ये श्री. वा. रा. ढवळे यांच्या संपादनाखाली सुरू झालेल्या ‘साहित्य’ या द्वैमासिकाच्या रूपाने झाला. ‘वीणे’च्या निर्मितीपाठीमागचे हेतू अतिव्याप्त होते म्हणा, किंवा त्या वेळी संघाच्या कार्याचा प्रसार फारसा झाला नव्हता म्हणून म्हणा, पण ‘वीणे’ची तार विशेष जुळलीच नाही!

## संपादकीय दृष्टिकोन

जानेवारी १९४७ ते जानेवारी १९५२ असे जेमतेम पाच वर्षांचे अल्प आयुष्य ‘साहित्य’ या द्वैमासिकाला लाभले. पण या पाच वर्षांमधील एकूण सव्वीस अंकांमधून

अनुक्रमणिका

वैशिष्ट्यपूर्ण आणि दर्जेदार वाङ्मयाचा पुरवठा करण्याचे श्रेय यातील लेखकां-इतकेच श्री. वा रा. ढवळे यांच्या कुशल आणि चोखंदळ संपादनालाही द्यावे लागेल. ' साहित्या'च्या संपादनास आरंभ करण्यापूर्वी त्या वेळच्या ' पारिजात ', ' ज्योत्स्ना ', ' रागिणी ' इ० मासिकांच्या संपादनाचा अनुभव त्यांच्यापाशी होता. शिवाय संघाचे संस्थापक डॉ. अ. ना. भालेराव यांची प्रभावी प्रेरणाही त्यांच्या पाठीमागे उभी होती.

या वेळच्या इतर वाङ्मयीन नियतकालिकांकडे दृष्टिक्षेप टाकला तर वाङ्मयीन नियतकालिक काढणे म्हणजे ' नवीन बाटलीत जुनीच दारू भरण्याचे काम करणे ' असे समीकरण तयार झाले होते. नाही म्हणायला ' अभिरुची 'ने व ' सत्यकथे 'ने काही नवीन लेखक पुढे आणण्याचा प्रयत्न चालवला होता. या पार्श्वभूमीवर पाहता ' साहित्य ' चे संपादन तटस्थ संकलकाचे राहिले नव्हते, हे ' साहित्या ' चे एक वैशिष्ट्यच मानावे लागेल. त्याच त्या जुन्या लेखकांच्या तपश्चर्येचे सक्तीने सरवहरण करण्यापेक्षा नवनवीन लेखक हुडकून त्यांच्यातील नवनिर्माणक्षमतेस चालना देण्याचे ' साहित्य'चे संपादकीय धोरण प्रशंसनीय होते असे म्हणावे लागेल.

या दृष्टीने आजचे प्रथितयश, पण त्या वेळचे नवोदित असे अनेक लेखक ' साहित्या ' ने पुढे आणले. अरविंद गोखले, सदानंद रेगे यांसारखे लघुकथालेखक, वा. रा. कान्त, कृ. ब. निकुम्ब, विंदा करंदीकर हे कवी आणि इंदिरा संत ही कवयित्री, ना. वा. पराडकर, दि. के. बेडेकर, रमेश तेंडुलकर हे समीक्षक, या सर्व त्या वेळच्या नवोदितांना ' साहित्या' ने विकसित होण्याची संधी प्राप्त करून दिली असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. वरील नवोदितांप्रमाणेच त्या वेळच्या बहुतेक सर्व सुप्रतिष्ठित लेखकांनीही ' साहित्या ' च्या प्रगतीस मोलाचा हातभार लावलेला दिसून येतो. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, न. र. फाटक, द. सी. पंगू, श्री. के. क्षी., प्र. के. अत्रे, व. शां. देसाई, अनंत काणेकर, वि. ह. कुलकर्णी, वा. ल. कुलकर्णी, गंगाधर गाडगीळ, मं. वि. राजाध्यक्ष, गो. के. भट इत्यादी लेखक; यशवंत, पु. शि. रेगे, बा. सी. मर्ढेकर, रा. अ. काळेले हे कवी व संजीवनी ही कवयित्री या सर्वांनी ' साहित्या ' तून कमीअधिक प्रमाणात लेखन केले आहे, ही घटना ' साहित्या ' च्या लोकप्रियतेची व विविधतेची द्योतक मानावी लागेल. वरील नामावलीवरूनसुद्धा या द्वैमासिकातील सकस वाङ्मयगुणांची ओझरती कल्पना येऊ शकेल.

## ' साहित्य ' : रूपरेषा

' साहित्या ' चे स्वरूप आरंभापासून अखेरपर्यंत संपूर्णतः वाङ्मयीन राहिलेले आहे. यामध्ये साहित्याशी संबंधित असणाऱ्या अशा चर्चात्मक व विवेचनपर लेखांचीच संख्या अधिक आहे. सुखात्मिका, संगीतक, एकांकिका हे वाङ्मयप्रकार आणि रस-व्यवस्थेशी निगडित असणारे विविध प्रश्न यांची मूलभूत स्वरूपाची चर्चा या लेखा-

मधून आलेली आहे. त्या खालोखाल 'साहित्या'त मनोविश्लेषणात्मक व प्रतिमांकित लघुकथांची संख्या आढळून येते. नवकथेबरोबरच नवकवितेच्या बाबतीत 'साहित्य' आघाडीवर होते. भावगीतांबरोबरच मुक्तच्छंदात्मक आणि प्रतिमांचा वापर करणाऱ्या भावकविताही आढळतात. 'साहित्या'च्या प्रत्येक अंकात सरासरीने आठ-दहा कविता प्रसिद्ध होत होत्या. तथापि 'साहित्या'च्या अनेक लेखकांच्या मनावर 'लघुनिबंध' या वाङ्मयप्रकारची मोहिनी पडलेली होती; व हा लघुनिबंध खांडेकर-प्रणीत लघुनिबंधाच्या चौकटीतून बाहेर पडला नव्हता. पुस्तक परीक्षणाबरोबरच गुजराती, कानडी, हिंदी इत्यादी भारतीय भाषा व इंग्रजी, जर्मन इत्यादी परकीय भाषा यांमधील वाङ्मयाचा चिकित्सक परिचय करून देण्यामागे प्रयोगशीलता दिसून येते.

या इतर सदरांबरोबरच खुद्द संपादकांनी आरंभापासून अखेरपर्यंत चालविलेले 'साहित्य-विचार' हे सदर म्हणजे 'साहित्या'चे खास भूषणच आहे. यातून तत्कालीन वाङ्मयीन घडामोडींची दखल तत्परतेने घेतली गेली आहे. किंबहुना तत्कालीन वाङ्मयीन जीवनाचे एक सुसंगत व ऐतिहासिक स्वरूपाचे जिवंत दर्शन 'साहित्य-विचारा'ने घडवलेलं आहे. उदाहरणार्थ, कृ. पां. कुलकर्णी यांच्या व्युत्पत्तिकोशाचे प्रकाशन ही मराठी वाङ्मयाच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाची घटना किंवा ना. मा. संत, कवी 'बी', कृ. प्र. खाडिलकर, साधुदास आदी प्रसिद्ध वाङ्मयसेवकांचे निधन या घटना व त्या निमित्ताने त्यांच्या व्यक्तित्वाचे व वाङ्मयाचे मूल्यमापन संपादकांनी मार्मिकपणे केले आहे.

## खास अंकांची कामगिरी

आपल्या छोट्याशा कारकीर्दीतही 'साहित्या'ने तीन समृद्ध विशेषांकांची निर्मिती करून मोलाची वाङ्मयसेवा बजावली आहे. नाट्यमहोत्सवाच्या निमित्ताने दोन ( एप्रिल १९४७ व डिसेंबर १९४८ ) आणि साहित्यसंमेलनाच्या निमित्ताने एक ( मे १९५० ) असे तीन विशेषांक 'साहित्या'ने काढले.

दोन्ही नाट्यमहोत्सव-विशेषांक हे एकांकिका, संगीतक इ. नाट्यप्रकार, नाट्य व रंगभूमीशी संबंधित असणाऱ्या संगीत, प्रकाशयोजना इ० घटकांची चर्चा, रंगभूमी-वरील अधिकारी व्यक्तींच्या मुलाखती व जुन्या जमान्यातील नट-नटी, नाटककार, दिग्दर्शक यांची दुर्मिळ छायाचित्रे यांनी वैशिष्ट्यपूर्ण झालेले आहेत. डिसेंबर १९४८ च्या नाट्यमहोत्सव विशेषांकाने दोन स्तुत्य उपक्रम केले होते. या अंकाने मराठी रंगभूमीविषयक विचारांना चालना देण्याच्या उद्देशाने त्या वेळचे प्रसिद्ध दिग्दर्शक, नाटककार व नट यांच्याकडे एक प्रश्नावली पाठवून त्यांचे त्यावरील विचार एकत्रित करण्याचा एक चिकित्सक प्रयत्न केला. त्याचबरोबर 'एकांकिका' या वाङ्मय-

अनुक्रमणिका

प्रकाराला उत्तेजन देण्यासाठी या अंकाने एकांकिकांची एक स्पर्धाही आयोजित केली होती. नाट्यमहर्षी कृ. प्र. खाडिलकरांच्या वाङ्मयाचे व व्यक्तिमत्त्वाचे समालोचन करणारे लेख हे या अंकाचे प्रधान वैशिष्ट्य आहे.

## ' साहित्या'च्या वाङ्मयसेवेचे स्वरूप

' साहित्या' च्या आशयाच्या आणि अभिव्यक्तीच्या नावीन्याच्या संदर्भात एक धृष्ट स्वरूपाचा प्रयत्न म्हणून डिसेंबर १९४९ च्या अंकातील गंगाधर गाडगीळ यांच्या ' उंट आणि लंबक ' या नवकथेचा उल्लेख करता येईल. शृंगाराचा एक चाकोरीवेगळा आविष्कार प्रतीकात्मक रीतीने व्यक्त करणाऱ्या या कथेने संघाचे सभासद व वाचक यांच्यात विलक्षण खळबळ माजवली होती. तीच गोष्ट ' जिथे मारते कांदेवाडी–टांग जराशी टाकुरद्वारा ' या मर्ढेकरांच्या कवितेची! प्रस्तुत कविता ऑगस्ट १९४७ च्या अंकात प्रसिद्ध झाली होती.

' साहित्य ' जसे आशयाच्या बाबतीत नावीन्यपूर्ण व वैविध्यपूर्ण होते, तसेच ते अभिव्यक्तीच्या बाबतीतही अंतर्बाह्य सजावटीने नटलेले होते. मजकुराची उत्कृष्ट छपाई व अभिनव मांडणी, साहित्य-नाट्य-संगीत इत्यादी क्षेत्रांत प्रसिद्ध असणाऱ्या ज्योत्स्ना भोळे, कुसुमावती देशपांडे, कृ. प्र. खाडिलकर, कविवर्य यशवंत आदींची मुखपृष्ठावरील चित्रे, त्या त्या अंकाला साजेल अशा इतर आकर्षक मजकुराची मांडणी यामुळे ' साहित्य ' हे अंतर्बाह्य वैशिष्ट्यपूर्ण झाले होते.

संपादकांनी नवीन लेखकांना पुढे आणण्याबरोबरच विशिष्ट वाङ्मयीन दर्जा टिकवण्याकडेही लक्ष पुरविले. महाराष्ट्रात उच्च दर्जाची वाङ्मयीन मासिके अल्पायुषी ठरतात, या कटू सत्याचे भान असूनही वाङ्मयाचा आदर्श टिकवण्याच्या व वाङ्मयापुढे नवे आदर्श निर्माण करण्याच्या ध्येयाने प्रेरित होऊन श्री. वाः रा. ढवळे यांनी काढलेले पुढील उद्गार अतिशय सूचक आहेत : " चांगली मासिके बुडतात याचे कारण वाईट मासिके म्हणून जगण्याची त्यांची इच्छा नसते हेच होय. " आपल्या पाच वर्षांच्या अवधीतही ' साहित्या' ने ' चांगले मासिक ' म्हणूनच जगण्याची धडपड केली. नावीन्यपूर्ण, आशयगर्भ आणि मूलभूत विचार करावयास लावणारा मजकूर वाचकांना सातत्याने पुरवला. ' साहित्या ' चे प्रत्येक पृष्ठ वाचनीय व चिंतनीय आहे. आजही ' साहित्या ' चे अंक वाचताना आपण तीस वर्षांपूर्वीचे अंक वाचत आहोत व काहीतरी तात्कालिक माहिती चाळत आहोत ही भावना मनात येत नाही. ' साहित्या ' ने वाचकाला अभिजात साहित्याचे उपायन पानापानांतून सादर केले आहे.

■

# 'प्रतिभे'चा वाङ्मय-विहार

राम वि. मंत्री

'प्रतिभा' या केवळ साहित्याला वाहिलेल्या पाक्षिकाचा नमुना अंक ५ डिसेंबर १९३२ ला निघाला, व तदनंतर २ जानेवारी १९३३ पासून त्याचे अंक एक सोडून एक शुक्रवारी निघत असत. हे पाक्षिक १९३७ पर्यंत म्हणजे पाच वर्षे चालू होते. १९३६ मधील काही अंक आकाराने किंचित मोठे निघाले, ते वगळल्यास एखाद्या मासिकासारखाच त्याचा आकार व मुखपृष्ठ असे. मुखपृष्ठावरच लेख, लेखक व सदरे यांचा उल्लेख असे. त्यामुळे अंकाचे अंतरंगही झटकन नजरेत भरे. कधी एखादे निसर्गचित्र, शिल्प, काळाच्या संदर्भात गाजलेली व्यक्ती यांची चित्रे मुखपृष्ठावर असत. क्वचित एखाद्या सिनेमानटीचेही चित्र असे. पाक्षिक बंद पडेपर्यंत अंकाचे बाह्यांग आकर्षक राखलेले दिसून येते.

'ज्या काळात 'प्रतिभा' सुरू झाले, तो काळ सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाचा होता. उच्च शिक्षणाच्या संस्था स्थिर झाल्यासारख्या होत्या. पाश्चात्त्य वाङ्मय, कला, तत्त्वज्ञान यांचा अभ्यास करून बौद्धिक दृष्ट्या संपन्न अशी पिढी तयार झाली होती. राजकीय व सामाजिक दृष्ट्या समाजाच्या वरच्या थरातले प्रबोधनयुग मागे पडत चालले होते. जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करणाऱ्या भिन्नभिन्न विचारधारा पुढे येत होत्या, अनेक सांस्कृतिक जटिल प्रश्न ग्रासू लागले होते. असा सर्वांगीण प्रश्नचिन्हांनी भरलेला तो काळ होता. सुशिक्षित माणसाला या वातावरणात अलिप्त राहणे अशक्य होते. साहित्याच्या क्षेत्रातच नव्हे, तर जीवनाच्या विविध क्षेत्रांत येणारे अनुभव माणसाला अधिकाधिक अंतर्मुख होण्यास भाग पाडीत होते. या नव्या पिढीत नव्या जाणिवांचे विचारमंथन सुरू झाले. या विचारमंथनाला अभिव्यक्तीचे माध्यम हवे होते. ते 'प्रतिभे'ने उपलब्ध करून दिले.

या पाक्षिकाच्या संपादक-मंडळात गं. दे. खानोलकर, के. नारायण काळे, खं. सा. दौंडकर, व वि. ह. कुलकर्णी हे चौघेजण होते. या व्यक्तींच्या मागे काहीएक वाङ्मयीन परंपरा आणि ध्येयवाद होता. या मंडळींना एखादे वृत्तपत्र व मतपत्र काढावयाचे नव्हते, किंवा जथाबंद खप होईल अशा प्रकारचे नियतकालिक सुरू करायचे नव्हते. आपल्या ध्येयवादाला व साहित्यप्रीतीला अनुसरून बौद्धिक चर्चा घडवून आणाव्या,

साहित्यविषयक मतमतांतरे लोकांपुढे यावीत, उत्तमोत्तम ग्रंथ व ग्रंथकार यांचा परिचय करून दिला जावा, व तत्कालीन सुशिक्षित पिढीची बौद्धिक भूक भागवावी हा या मंडळींचा उद्देश होता. या उद्देशानुसार ' प्रतिभे 'ने कला, साहित्य व विचार यांचे भरणपोषण सतत चालविले. पण अशा ध्येयवादी नियतकालिकाला पहिल्याच वर्षी जबरदस्त आर्थिक तोटा सहन करावा लागला. श्री. ह. वि. मोटे यांनी पुढे येऊन, या कठीण परिस्थितीत प्रतिभेचा आर्थिक बोजा आपल्या खांद्यावर घेतला, व पुढे पाच वर्षेपर्यंत प्रतिभेला आपल्या परीने व्यापक स्वरूप प्राप्त होईल असा शिकस्तीचा प्रयत्न त्यांनी केला.

त्या पाच वर्षांतील ' प्रतिभे 'च्या कार्याचा मागोवा घेणे जसे मनोरंजक, तसेच साहित्याच्या दृष्टीनेही उपयुक्त आहे. या कारकिर्दीत प्रतिभेच्या हातून साहित्यसेवा कितपत घडली ? तिचे स्वरूप काय होते ? ते केवळ वाङ्मयीन होते का ? प्रसिद्ध होणाऱ्या लेखनाची दिशा कोणती होती ? नवे लेखक तिने घडविले वा त्यांना उत्तेजन दिले का ? तिने कोणते वाङ्मयीन वाद उपस्थित केले ? कोणकोणते नवे उपक्रम पुढे मांडले ? असे विविध प्रश्न मनात येतात. या प्रश्नांच्या संदर्भात प्रतिभेच्या कार्याचे स्वरूप दिग्दर्शित करणे हाच या लेखाचा उद्देश आहे. तत्कालीन सामाजिक, मानसशास्त्रीय, धर्मविषयक, तत्त्वज्ञानविषयक, विचार ' प्रतिभे 'मध्ये उमटले. मात्र राजकारणापासून प्रतिभा अलिप्त राहिलेली दिसते. राजकीय घडामोडी वा विचार यांना ' प्रतिभे 'ने स्थान दिले असते तर तिचे स्वरूप बदलून ते एक वृत्तपत्र झाले असते.

' प्रतिभे 'च्या अंकांकडे सहज दृष्टिक्षेप टाकला तर लक्षात येते की, त्या काळच्या महाराष्ट्रातील सर्व प्रसिद्ध व्यक्तींनी कोणत्या ना कोणत्या स्वरूपात प्रतिभेमध्ये लेखन केले आहे. त्या काळातील प्रथितयश कवी तांबे, माधव जूलियन, यशवंत, ग. ल. ठोकळ, वा. ना. देशपांडे, ग. ह. पाटील यांच्या कविता ' प्रतिभे 'त प्रसिद्ध झालेल्या आहेत. ' बीं 'ची ' गाविलगड ' येथेच प्रसिद्ध झाली. वा. ना. देशपांडे यांची ' नंदनवन मुकल्यावर ' आणि अनिलांची ' प्रेम आणि जीवन ' या प्रसिद्ध कविता प्रतिभेतच प्रथम प्रसिद्ध झालेल्या आहेत. तांब्यांच्या ' मधुघटा 'ला गोविंद झोकरकर यांनी काव्यातच दिलेले उत्तर हे त्या काळचे विशिष्ट वाङ्मयीन वातावरण दर्शविते. ' प्रतिभे 'ने एखादा नवा असा मोठा कवी पुढे आणला नाही. रविकिरण-मंडळानंतरच्या कवींतील मोठे कवी कुसुमाग्रज; पण त्यांच्याही फारशा कविता प्रतिभेत नाहीत.

लघुकथा अथवा लघुनिबंध यांच्या बाबतीतही हाच अनुभव येतो. फडके, खांडेकर हे त्या काळातील प्रसिद्ध कथाकार; पण कथाकार म्हणून ते फारसे प्रतिभेत लिहीत नाहीत. टीकात्मक, तात्त्विक लेखन करतात. वामन चोरघडे व कुसुमावती देशपांडे यांच्या कथा मधूनमधून दिसतात; पण ' प्रतिभे ' मध्ये ' कथा ' या वाङ्मयप्रकाराला

फार मोठे स्थान मिळालेले दिसत नाही. य. गो. जोशींसारखे अनेक कथालेखक थोडे-फार लेखन करतात तसे पाहिले तर येथे प्रथितयश अशा लेखकांची वर्णी लागलेली दिसते, पण बहर आलेला दिसत नाही. नव्या लेखकांना उत्तेजन देऊन पुढे आणावे असेही धोरण फारसे दिसत नाही. कवी अथवा लेखक, जे यशस्वी झालेले आहेत, त्यांचे सकस वाङ्मय वाचकांना पुरवावे असा 'प्रतिभे'चा हेतू असावा. थोडक्यात म्हणजे प्रतिभेने तत्कालीन प्रसिद्ध कवी अगर लेखक यांना वगळले नाही. तसेच एखादा नवा लेखक पुढे आणला नाही.

साहित्यसेवेसाठी वाहिलेल्या या पत्राने स्वतंत्र ललित वाङ्मयाला फार जागा दिली नसली तरी साहित्यविषयक इतर अनेक प्रश्नांचा विस्तृत विचार केलेला दिसतो. तात्त्विक चर्चा हा या पत्रातील फार मोठा भाग होता. अनेक चांगले उपक्रम प्रतिभेने सुरू केले.

प्रा. वा. म. जोशी यांची 'इंदू काळे व सरला भोळे' ही पत्रात्मक कादंबरी क्रमशः 'प्रतिभे'ने प्रसिद्ध केली. हा एक चांगला उपक्रम होता. वाचकांना एक स्वतंत्र सामाजिक कादंबरी वाचायला मिळाली हे तर खरेच, पण या कादंबरीच्या संदर्भात अनेक महत्त्वाच्या विचारांना चालना मिळाली. जीवन व कला यांचे संबंध, जीवन व प्रचलित नीती, स्त्रीस्वातंत्र्य आणि त्याचे स्वरूप, ध्येय आणि व्यक्तिजीवन यांतील द्वंद्व यांविषयीचे विचार आणि चर्चा यांची एक बौद्धिक मेजवानीच तत्कालीन विचारवंतांना मिळाली. कादंबरीसारख्या ललित वाङ्मयाच्या माध्यमातून हे झाले हे विशेष.

त्या काळात प्रसिद्ध होणाऱ्या महत्त्वाच्या पुस्तकांवर 'प्रतिभे'त अनेक परीक्षणात्मक लेख आले. विभावरी शिरूरकरांची 'हिंदोळ्यावर' आणि 'कळ्यांचे निश्वास' ही पुस्तके प्रसिद्ध झाल्यावर त्यांवर अनेक चर्चात्मक लेख आले. स्त्रीजीवनातील जिव्हाळ्याच्या प्रश्नांना विभावरींनी हात घातला होता. तत्कालीन समाजातील स्त्री-समोरील अनेक प्रश्न पुढे येत होते. या दोन पुस्तकांत पुढे आलेल्या प्रश्नांचा ऊहापोह करण्यासाठी प्रतिभेने कित्येक पृष्ठे दिली आहेत. ही सर्व चर्चा नंतर एवढी विस्तृत झाली की, त्यावर थट्टेने टीका करावी लागली. टीका झाली ती पुढील मजेदार कोष्टकात :

| | | |
|---|---|---|
| ११ कळ्यांचे निश्वास | = | १ हिंदोळा |
| १ हिंदोळा | = | १० चर्चा |
| १ चर्चा | = | १० वक्ते |
| १० वक्ते | = | १ च मुद्दा |
| १ मुद्दा | = | वाटेल तेवढे तास |
| वाटेल तेवढे तास | = | श्रोत्यांची एक झोप. |

स्त्रीजीवनातील प्रश्नांबरोबर काही तात्त्विक चर्चा पुढे आल्या. 'प्रेम हे विष की

अनुक्रमणिका

अमृत ?' हा प्रश्न महत्त्वाचा बनला. 'हिंदोळ्यावर' या पुस्तकावर डॉ. केतकर, के. नारायण काळे यांसारख्या मोठ्या व्यक्तींनी चर्चा केली. तर 'प्रेम हे विष की अमृत' या चर्चेत शं. दा. पेंडसे, रा. भि. जोशी, माधव मनोहर यांसारख्या मातबर व्यक्तींनी आपली मते व्यक्त केली. 'प्रतिभे'चे एकूण वातावरण चर्चेने भरलेले दिसू लागले.

प्रतिभेने त्या काळी प्रसिद्ध झालेल्या प्रमुख पुस्तकांचा परामर्श घेतलेला आहे. सावरकरांची कविता, फलभार इत्यादी काव्यसंग्रह, तसेच मानसलहरी, चिमणरावांचे चऱ्हाट, दिवाकरांच्या नाट्यछटा, श्यामकांताची पत्रे इत्यादी अनेक साहित्यकृती यांवरील परीक्षणे प्रथितयश लेखकांनी केलेली आहेत. या सर्वत्र टीकांचा दर्जा चांगला आहे.

साहित्य-निर्मितीनंतर त्यातून उपस्थित होणाऱ्या प्रश्नांबरोबर अथवा परीक्षणाच्या संदर्भात पुढे येणाऱ्या प्रश्नांबरोबर स्वतंत्रपणे साहित्यविषयक अशा प्रश्नांची मोठी चर्चा प्रतिभेने केली. 'वाङ्मयक्षेत्रात नियंत्रक संस्थेची आवश्यकता' या शीर्षकाखाली डॉ. केतकर यांनी १६ फेब्रुवारी १९३४ च्या अंकात एक लेख लिहिला. अश्लील वाङ्मयापेक्षा खोटे वाङ्मय तिरस्करणीय आहे, असे मत यात केतकरांनी व्यक्त केले होते. या महत्त्वाच्या प्रश्नावर पां. वा. काणे शं. दा. पेंडसे, न. चिं. केळकर, वा. म. जोशी, ना. गो. चापेकर, माधव जूलियन, ना. सी. फडके, र. धों. कर्वे, वि. स. खांडेकर, श्री. ना. बनहट्टी इत्यादींनी आपली मते व्यक्त केली. शेवटी चर्चेचे पर्यालोचन डॉ. केतकरांनी करून ही प्रदीर्घ लेखमाला संपली. या चर्चेत भाग घेणाऱ्या व्यक्तींची ही नावे जरी नजरेखालून घातली तरी चर्चेचे स्वरूप व दर्जा लक्षात यावा.

डॉ. केतकरांनी आपल्या आयुष्यातील आठवणी जवळजवळ १०-१२ अंकांत प्रसिद्ध केल्या आहेत.

स्फुट कथा अथवा कविता मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध करण्यापेक्षा क्रमशः लेखमाला सादर करणे 'प्रतिभा'कारांनी पसंत केलेले दिसते. केतकरांच्या आठवणी जशा त्यांनी क्रमशः प्रसिद्ध केल्या, तसेच काही अन्य वाङ्मयही प्रसिद्ध केले. काणेकरांचे 'तुटलेले तारे' प्रतिभेमध्ये क्रमशः प्रसिद्ध होत होते. या लेखांतून काणेकरांची काही मते सहजपणे प्रकट होत होती. तीसुद्धा काही वेळा वादविषय झालेली दिसतात. वास्तविक काणेकरांचे लेखन लघुनिबंधांच्या पातळीवरचे आहे. पण प्रतिभेच्या जागरूक वाचकांनी त्यातील विचारांचाही परामर्श घेतला. प्रतिभेने सर्वांनाच विचार व्यक्त करण्याची संधी दिली.

साहित्यनिर्मिती ही कधी-कधी नकळत होत असते. आत्माविष्कार हा तर ललित वाङ्मयाचा प्रमुख घटक आहे. प्रतिभावंतांच्या खाजगी पत्रांतून कित्येक वेळा

जी अभिव्यक्ती होते, तिला वाङ्मयीन पातळी लाभते. खाजगी पत्रांतील काही उतारे देण्याचे कार्य प्रतिभेने केले. 'शारदेचा विश्रब्ध विहार' या शीर्षकाखाली अनेक साहित्यिकांच्या काही खाजगी पत्रांतील भाग प्रसिद्ध करण्यात आला. या पत्रांतील बराच भाग साहित्याशी संबंधित आहे. पु. य. देशपांडे, माधव ज्यूलियन, ना. सी. फडके, ' ' बी, ' इत्यादी साहित्यिक यांत येऊन गेले. (आजच्या 'विश्रब्ध शारदा'चे हे पूर्वरूप आहे.)

खाजगी पत्र प्रमाणेच 'दैनंदिनी'-लेखन हाही आत्माविष्काराचाच भाग असतो. उत्तम लिहिलेली दैनंदिनी एखाद्या मोठ्या व्यक्तीच्या चरित्राचा आधार होऊ शकते. दैनंदिनीत बऱ्याच प्रमाणात मन मुक्त होऊ शकते. 'दृष्टिआडच्या सृष्टीत' या सदराखाली काही चांगले उतारे प्रतिभेत प्रसिद्ध झाले.

'प्रतिभेच्या दरबारात' या सदरात 'रामशास्त्री' या टोपण नावाने कै. वा. ना. देशपांडे यांची अनेक विषयांवर टीका आली आहे. या रामशास्त्रींची लेखणी बरीच तिखट आहे; आणि सर्व विषयांवर ते आपली लेखणी चालवितात. त्यांनी बरीच वादग्रस्त विधाने केलेली आहेत. यामुळे माधव ज्यूलियन, यशवंत आदी साहित्यिकांशी त्यांचा वादही झालेला आहे. (रामशास्त्र्यांच्याच बाण्याने नागपूर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष कृ. प्र. खाडिलकर यांच्या भाषणावर व वागणुकीवर सडेतोड टीका प्रतिभेने केलेली आहे.) रामशास्त्री यांची मते कुणाला पटोत वा न पटोत, पण त्यांच्या लेखणीत न्यायाधिशाला शोभणारा निर्भीडपणा आहे, हे कबूल करावे लागते. प्रतिभेचे हे एक महत्त्वाचे आणि आकर्षक सदर होते.

प्रतिभेने केलेले साहित्यविषयक कार्य मोठे आहे हे अनेक लेखमालांवरून सहज लक्षात येते. 'साहित्य आणि संसार' ही प्रा. फडके यांची लेखमाला प्रतिभेने १९३६ च्या अंकात चालू केली. पाच विस्तृत लेख यात समाविष्ट आहेत. साहित्याविषयीची फडके यांची एक विशिष्ट भूमिका यातून व्यक्त होते. 'ललित वाङ्मयाचा आद्य हेतू' या लेखात फडक्यांनी आपली वाङ्मयविषयक भूमिका स्पष्ट केली होती. साहित्य-विषयक चर्चेला प्रतिभेइतके दुसऱ्या एखाद्या पत्राने क्वचितच स्थान दिलेले असेल. 'जीवनकला' मधील खांडेकरांच्या लेखावर प्रभाकर पाध्ये यांनी आपले विचार व्यक्त केले. तसेच 'भौतिकता आणि वाङ्मय' यावर विवेचनही केले. 'साहित्य' या विषयावर वेगवेगळ्या संदर्भांत परस्परपूरक व परस्परविरोधी विचारांना प्रतिभेत स्थान मिळाले. 'साहित्य आणि समाजजीवन' या विषयावर पु. य. देशपांडे यांनी सात विस्तृत लेख लिहून आपली साहित्यविषयक भूमिका स्पष्ट केली. याच संदर्भात वाङ्मयातील नीति-अनीती (डॉ. श्री. व्यं. केतकर), मराठी वाङ्मयातील वाद (श्री. म. वर्दे), ललित वाङ्मय व बोधवाद (वा. ना. देशपांडे), साहित्यातील सत्य-दर्शन व नीतिबोध (अ. म. जोशी) हे लेख प्रतिभेत प्रसिद्ध झाले. कलेचा हेतू, कला

व प्रचार, यावर नी. म. केळकरांचे लेखही लक्षणीय आहेत.

साहित्यविषयक चर्चा व वाद याबरोबरच परिसंवादासारखे उपक्रमही प्रतिभेने केले. ' ललित वाङ्मयातील नवे प्रवाह ' या सदरात श्री. ना. बनहट्टी, रा. श्री. जोग, वि. ह. कुलकर्णी, अ. म. जोशी, खं. सा. दौंडकर इत्यादी विचारवंतांनी नाट्य, काव्य, कादंबरी, चरित्रे, लघुकथा या वाङ्मयप्रकारांतील नव्या प्रवाहांचा परामर्श घेतला.

विविध प्रकारचे वाद हा प्रतिभेचा स्थायीभावच झालेला दिसतो. ' नावीन्यवाद व नवमतवाद ' या ' विजय कृष्णां 'च्या लेखावर अनेक लेखकांनी आपली मते सडेतोड-पणे मांडली. वि. ह. कुलकर्णी व श्री. काळी यांचे यावरचे लेख उल्लेखनीय आहेत.

साहित्याला वाहिलेल्या या पत्रात समाजाचा विचार अगदी अपरिहार्यपणे आला. साहित्य अथवा समाज याविषयीचे विचार व्यक्त करताना अनेक लेखमाला 'प्रतिभे'ने सुरू केल्या, तसाच अनेक सदरांचा वापर केला. प्रतिभेने चालू केलेली विविध सदरे संपादकांची दृष्टी आणि कौशल्य यांची साक्ष देतात. ' आजकालचे प्रश्न ' या सदरात वेगवेगळ्या नऊ लेखकांनी वेगवेगळे प्रश्न हाताळले आहेत. ' वाङ्मय आणि अनीती ' ते 'तरुण पिढीला लैंगिक स्वैराचार पाहिजे काय ?' अशा प्रश्नापर्यंत विविध विषय यात येतात. ' चोरबाजारातील चिजा ' आणि ' पश्चिमेकडील वारे ' ही प्रतिभेची सदरे वैशिष्ट्यपूर्ण अशीच आहेत. पाश्चात्त्य वाङ्मयाचा परिचय करून देणे, काही प्रसिद्ध साहित्यकृतींचा अनुवाद करणे अशी कामे प्रतिभेने केली. ' छायानाद ' या सदरात चित्रपट व चित्रपट कलावंत यांवर परखड अशी टीका आली आहे.

' महाराष्ट्राचे केंद्र ' या श्री. ना. बनहट्टींच्या एका लेखावर सहजपणे एक परिसंवाद घडून आला. दत्तो वामन पोतदार, वा. वि. जोशी, श्री. म. वर्दे, पुणतांबेकर व मामा वरेरकर यांनी यात भाग घेतला. ' महाराष्ट्राचे केंद्र ' या लेखात वरेरकर पुण्याला ' सनातनी क्षेत्र ' म्हणतात. बनहट्टींनी समारोप केलेला हा वादविषय चांगलाच रंगला होता. एखाद्या गोष्टीच्या पूर्ण ऊहापोहाकडे प्रतिभेचे लक्ष होते असे दिसते. स्फुट लेखांपेक्षा पूर्ण विवेचन करणाऱ्या लेखमाला वा क्रमशः आलेले अनेक लेख हेच दर्शवितात. ' महाराष्ट्राची साहित्य संस्था ' ही बनहट्टींची लेखमाला, ' महाराष्ट्र साहित्य संमेलन-वादमीमांसा ' ( तीन लेख ) हे शेंड्यांचे लेख, केतकरांच्या ' प्राचीन महाराष्ट्र ' वरील मधुसूदन सरस्वतींचे लेख, ' मराठी कादंबरी वाङ्मय ' यावरचे प्रो. साळगावकरांचे लेख, ' नाटक की कादंबरी ' हे वि. ह. कुलकर्णी यांचे क्रमशः प्रसिद्ध झालेले लेख, भारत इतिहास संशोधन मंडळ या संस्थेवरून झालेला सरदेसाई–पोतदार वाद, यांवरून प्रतिभेच्या स्वरूपाची कल्पना येते. प्रतिभेने एक बौद्धिक जग निर्माण केले होते. यात चर्चा, परिसंवाद, वादविवाद, टीका, प्रतिटीका, परीक्षणे, रसग्रहणे यांना मोठे स्थान होते.

तात्त्विक आणि संशोधनपर विषयांकडेही प्रतिभेने लक्ष पुरविलेले दिसते. अ. का. प्रियोळकर यांनी ' दमयंती-स्वयंवर ' संपादन करून प्रसिद्ध केले होते. या ग्रंथाचे परीक्षण वि. भि. कोलते यांनी केले. भ. श्री. पंडितांनी रघुनाथ पंडितांच्या काळाचा वाद पुढे आणला. रघुनाथपंडित ( स्वयंवर-कर्ता ) नेमका कोणता, हा वादही पुढे आला. प्रियोळकरांनी ' पंतांचा माळ व पंतांचा काळ ' या लेखात, वरील लेखांतील मुद्यांना उत्तरे दिली. या संदर्भात त्यांनी रघुनाथपंडित व मोरोपंत यांच्या काळाची चर्चा केली. तीत रघुनाथपंडित वेगळे आहेत, या रियासतकारांच्या विवेचनाचाही प्रियोळकरांनी परामर्श घेतला.

प्रतिभेमध्ये कविता फार मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध झाल्या नाहीत असे आरंभी म्हटले आहे; पण कवितेच्या संदर्भात नेहमी पुढे येणारा एक महत्त्वाचा विचार प्रतिभेने मांडला : ' मुक्तच्छंद '–वादाचा इतिहास अनिलांनी क्रमशः सांगितला. ' मुक्तच्छंदा 'वर वा. ना. देशपांडे यांनी चर्चा केली.

साहित्याबरोबरच इतर ललितकलांचा परामर्श घेण्याचा उपक्रम ' प्रतिभे 'ने केला. ना. सी. फडके यांनी आपल्या लघुकथा प्रतिभेत फारशा प्रसिद्ध केल्या नाहीत, पण संगीत या विषयावर त्यांनी लेख लिहिले. केशवराव भोळे यांनीही ' चित्रपट व संगीत ' यावर लेख लिहिला, तर ' वाङ्मय व चित्रकला ' यावर पु. श्री. काळे यांनी विवेचन केले. माडखोलकरांनी ' वृत्तपत्रे व टीकालेख ' यावर विचार व्यक्त केले.

साहित्य, संगीत व कला यांबरोबरच आर्थिक प्रश्नही क्वचित चर्चिले गेले. धनंजयराव गाडगीळांनी 'हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास' लिहिला. त्याचे प्रतिभेत एका अभ्यासकाने परीक्षण केले. या परीक्षणाचे परीक्षण परत धनंजयरावांनी करून आपले मुद्दे बिनतोड-पणे मांडले. प्रतिभेच्या अंकात एकाच विषयाची पुनरावृत्ती झाल्यासारखी कधीकधी वाटते. याचे कारण तीत एखादा लेख प्रसिद्ध झाला की, त्यावर वादविवाद आणि चर्चा होत असत. या अनुषंगाने विषय पिंजून निघे, पण त्याच्या अनेकविध बाजू पुढे येत आणि ही पुनरावृत्ती नव्हे असे लक्षात येई. प्रतिभेतील वाद कधी साहित्य, तर कधी तात्कालिक महत्त्वाचे प्रश्न यांवर असत. म्हणूनच ' मार्क्सवाद व हिंदुस्थान ' ( मानवेंद्रनाथ रॉय ), ' वाङ्मयातील जडवाद ' ( श्री. के. क्षीरसागर ), ' लौकिक आकांक्षा व वाङ्मयाची दिशा ' ( डॉ. श्री. व्यं. केतकर), ' मार्क्सची मानवता ' आणि ' लेनिन व कला ' ( पु. य. देशपांडे ), ' वैभवशाली हिंदुराष्ट्र ' व ' मराठीचे क्रियापद दारिद्र्य घालवा ' (वि. दा. सावरकर), ' सूफी पंथ व भागवत धर्म ' ( न. र. फाटक ) इत्यादी गंभीर विवेचक लेखांबरोबरच ' स्त्रियांनी रंगभूमीवर काम करावे का ? ' असा तत्कालीन महत्त्वाचा, पण आज सामान्य वाटणारा प्रश्न प्रतिभेत चर्चिला गेला. सावरकरांच्या भाषाशुद्धीवरील लेखाबरोबरच 'इकबालका तराणा'–' सारे जहां से 'चा परिचय लेख ( शास्त्री ) प्रसिद्ध झाला. सारांश, प्रतिभेला कशाचेही वावडे दिसत

अनुक्रमणिका

नाही. ती सर्वसमावेशक आहे. कोल्हापूरच्या विविध क्षेत्रांतील, विशेषतः चित्रपट कलावंतांचा प्रतिभेने परिचय करून दिला, तसेच परभाषेतील थोर व्यक्ती व साहित्यिक यांचेही परिचय करून दिले. गुर्जर कवी रामनारायण पाठक व न्हानालाल, हिंदी कवयित्री महादेवी वर्मा व मुन्शी प्रेमचंद, संपादक ए. रंगस्वामी अय्यंगार, डॉ. राधाकृष्णन इत्यादींचे परिचय प्रतिभेची विशालताच दाखवितात.

प्रतिभेत त्या काळी प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या, कथासंग्रह, काव्यसंग्रह, चरित्रे, नाटके यांची परीक्षणे लेखकांच्या परिचयासह प्रसिद्ध झाली. या परीक्षणाचे वैशिष्ट्य असे दिसते की, लेखक आणि परीक्षक तुल्यबळ असत. उदा.—' दोन ध्रुव 'चे परीक्षण प्रभाकर पाध्ये, ' पुनर्भेट 'चे के. नारायण काळे, ' घराबाहेर 'चे श्री. के. क्षीरसागर, ' मुक्तात्मा 'चे वि. ह. कुलकर्णी. यामुळे या परीक्षणांना केवळ वर्तमानपत्री लेखनाचे स्वरूप आले नाही. ' हिंदोळ्यावर ' व ' इंदू काळे व सरला भोळे ' यांवरील परीक्षणात्मक लेखांनी पुढे कोणते तात्त्विक रूप घेतले हे यापूर्वीच सांगितले आहे. आणखी कितीतरी महत्त्वाच्या पुस्तकांवर सुंदर परीक्षणे प्रतिभेत आलेली आहेत. सर्वांचा उल्लेख करणे केवळ अशक्य आहे. काही क्रमशः आलेल्या लेखांचा उल्लेखही करता आलेला नाही, याचा अर्थ ते लेख दुर्लक्ष करण्यासारखे आहेत असे नाही. ( वरेरकरांनी क्रमशः ' कोल्हटकर : मराठी नाटकाचे जनक ' यावर लेख लिहिलेले आहेत. ) आगरकर व माटे यांचे परिचय करून देणारे लेखही उल्लेखनीय आहेत.

प्रतिभेच्या समालोचनात तिच्या निघालेल्या खास अंकांचे विवेचन केल्याविना हा लेख पुरा होणार नाही. प्रतिभेने आपल्या पाच वर्षांच्या कारकीर्दीत एकूण चार विशेषांक काढले. १९३५ साली एक, १९३६ साली एक आणि १९३७ साली दोन अशी ही विभागणी आहे. १५ जानेवारी १९३६ चा अंक हा सावरकर विशेषांक आणि १ जुलै १९३७ चा अंक हा केतकर विशेषांक म्हणून निघाला. अर्थात या दोन व्यक्ती, त्यांचे साहित्य, त्यांचे विचार यांना त्यात प्राधान्य असणे स्वाभाविक होते. त्यामुळे त्यावर स्वतंत्रपणे काही लिहिणे शक्य नाही. संपादनाचे कौशल्य येथेही स्पष्ट दिसते. ४ एप्रिल १९३५ चा अंक हाही विशेषांक होता. त्यातील लेख बहुधा ललित वाङ्मयावर आधारलेले आहेत. प्रतिभेतील इतर अंकांतही ललित वाङ्मयावरील लेख येतच असत. एरवी असलेली नेहमीची सदरेही येथे आहेत. मग त्याला विशेषांक का म्हणायचे ? कारण तो पृष्ठसंख्येने मोठा आहे. फेब्रुवारी १९३७ ला निघालेल्या विशेषांकाबद्दलही हेच म्हणता येईल. या अंकात मार्क्स व लेनिन यांचे विचार आलेले आहेत. डॉ. इकबाल यांचा व त्यांच्या गीतांचा परिचय आहे, हेच त्याचे वैशिष्ट्य. पण असे वैचारिक लेखही प्रतिभेच्या प्रकृतीला नवीन नव्हते. येथेही पृष्ठसंख्येनेच त्याचे विशेषांक हे स्वरूप ठरले. आपल्या वर्गणीदारांना अधिकाधिक माप द्यावे हा स्तुत्य हेतू यामागे असेल.

'प्रतिभा' हे पाच वर्षे चालून बंद पडलेले पाक्षिक. पण या पाच वर्षांच्या अल्पकाळातील तिची भरारी गरुड-भरारी होती. 'प्रतिभा' म्हणजे उत्तम संपादन, विविध सदरे, नाना वादविवाद, प्रसिद्ध विचारवंत व साहित्यिक यांचे लेखन, निर्भीड टीका, सहृदय रसग्रहण, असे समीकरण झाले होते. महाराष्ट्राच्या बौद्धिक जीवनाचे पूर्ण प्रतिबिंब तीत पडले होते. डॉ. केतकर, वा. म. जोशी, फडके, खांडेकर, वि. ह. कुलकर्णी, क्षीरसागर, चोरघडे, कुसुमावती देशपांडे इत्यादी नामवंतांचे लेखन त्यातून प्रसिद्ध झाले. डॉ. केतकरांचा ठसा या पाक्षिकावर पूर्णपणे उमटला होता. सर्व दृष्टीने समृद्ध असलेले हे पाक्षिक केतकर विशेषांकाबरोबरच बंद पडले, हा दैवदुर्विलासच म्हणावा लागेल. प्रतिभेचा विलास हा देदीप्यमान असतो पण तो क्षणजीवीही असतो. 'प्रतिभे'ने आपले नाव सार्थ केले असेच म्हणावे लागते. अशा या पाक्षिकाच्या प्रत्येक अंकावर 'मुंबई व मध्यप्रदेश या शिक्षणखात्याने आपल्या शिक्षण संस्थांकरिता मंजूर केलेले' असे वाक्य लिहिलेले असे. यातून काय सूचना मिळते? 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयः नच धूमायितं चिरम्' अशा कोटीत गणना व्हावी, अशा प्रकारचे कार्य 'प्रतिभे'ने केले, यात शंका नाही.

■

## साभार स्वीकार

( २०-९-७७ पर्यंत )

**अग्निहोत्री द. ह.** : महाराष्ट्र संस्कृतीचे तात्त्विक अधिष्ठान, सुविचार प्रकाशन, पुणे; २५ रु.

**इनामदार कल्याण** : गाण्या गाण्या भिंगोऱ्या, ज्योत्स्ना प्रकाशन, मुंबई; १ रु.

**कदम अनंत** : स्वांत, अकॅडेमिक असो. प्रकाशन, मुंबई; ८ रु.

**कुलकर्णी गो. म.** : साहित्य : दलित आणि ललित, नूतन प्रकाशन, पुणे; १५ रु.

**जोशी श्रीपाद** : बालबंटातील चंद्रकोर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १२ रु.

**ढेरे रा. चिं. व वाळिंबे मो. मा.** : बालक्रीडा (संपादन) श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १५ रु.

**दंडवते वृंदावन** : कुलवृत्तांत; प्रकाशक अशोक शहाणे, कांदिवली पूर्व ६ रु.

**वर्वे अनिल** : थंक यू मि. ग्लाड, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; ७ रु.

५

# एका वाङ्मयीन 'अभिरुची'चे एक विहंगम दर्शन

## शांता गोखले

'अभिरुचि' हे नाव साहित्यप्रेमी कुटुंबांतील आमच्या पिढीच्या लोकांनी बोलण्यातून ऐकलेले. ते वाद, त्या चर्चा, तो हशा आमच्या शाळकरी डोक्यावरून जात असला तरी डोक्यावर काहीतरी समजावून घेण्यासारखे चालले आहे ही जाणीव सतत देत. वयाच्या चौदाव्या वर्षी माझ्या वहिणीने प्रथम अभिरुचीतील एक कविता वाचण्याचे धैर्य केले. कविता वाचल्यावर बराच वेळ स्तब्ध बसून ती शेवटी म्हणाली, "कळली नाही; म्हणजे ग्रेट असणार." पण न कळल्यामुळे ती कविता, आणि त्याचप्रमाणे अभिरुचीतील लेख, कथा, व समीक्षणे ही बुद्धीला आवाहन देणारी होती. आणि हेच अभिरुचीचे पहिले धोरण होते. वाचकाला ज्या प्रकारच्या साहित्याची, सवयीमुळे आधीच आवड उत्पन्न झालेली असते व बौद्धिक आळसामुळे चटक लागलेली असते, त्याहून वेगळे, नव्या आकार-शैली–आशयाचे लिखाण प्रसिद्ध करून, लोकांच्या वाचनाला व साहित्य विषयक विचारांना एक वेगळे वळण देण्याचा क्रम 'अभिरुची'ने सुरुवातीपासूनच आरंभिला. त्यामुळे प्रस्थापिताविषयी बंडखोरी व्यक्त करणाऱ्या प्रयोगशील साहित्याचे हे एक महत्त्वाचे माध्यम बनले.

'अभिरुची' ने केलेल्या कामगिरीचा आढावा घ्यायचा झाला तर त्याचे दोन भाग पाडावे लागतील. पहिल्या भागात 'अभिरुची'कडे आपण मराठी वाङ्मयास गती देणारे एक नियतकालिक म्हणून व दुसऱ्या भागात समाजाचे एक जिवंत इंद्रिय म्हणून पाहू या. मराठी साहित्य संमेलनाच्या पन्नासाव्या अधिवेशनातील अध्यक्षीय भाषणात श्री. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे ह्यांनी म्हटले, "१९४३ नंतरच्या, म्हणजे 'अभिरुची' निघाल्यापासूनच्या, मराठी साहित्यातल्या नव्या पर्वाला 'अभिरुची–कालखंड' म्हणावे, इतके या नियतकालिकाच्या वाङ्मयीन कामगिरीचे महत्त्व आहे. हे म्हणण्यामध्ये कुठेही अतिशयोक्ती नाही." 'अभिरुची'तून वर आलेल्या लेखकांची नावे नुसती डोळ्यांखालून घातली तर ह्याचा भरपूर पुरावा आपल्यास मिळतो. बाळ सीताराम मर्ढेकर, शरच्चंद्र मुक्तिबोध व भा. रा. लोवलेकर यांच्यासारखे कवी; व्यंकटेश माडगूळकर, गंगाधर गाडगीळ व शंकर पाटील असे कथाकार; 'क' ऊर्फ इरावती कर्वे यांच्यासारख्या ललित लेखिका,

पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे, पुरुषराज अळूरपांडे, मौजे पारलई[१] असे विनोदी लेखक; नारायण गोविंद कालेलकर, दिनेश माहुलकर असे अभ्यासक विद्वान, 'निषाद' ऊर्फ मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांच्यासारखे मार्मिक व खुमासदार वाङ्मयीन भाष्यकार आणि त्यांच्या 'वादसंवाद' या सदरातील मजकुराची रंगत आपल्या बेफाम व्यंग-चित्रांनी जास्तच खुलविणारी 'शमा' ऊर्फ चित्रकार दत्तात्रय गणेश गोडसे अशी साहित्य-ज्ञान–कला क्षेत्रांतील एकाहून एक मातबर मंडळी लोकांपुढे चमकली ती प्रामुख्याने पहिल्या पर्वातील 'अभिरुची'तून. वाङ्मयीन विडंबनाच्या क्षेत्रात पुरुष-राज अळूरपांडे ( उदा. 'इसाप, फडके, खांडेकर आणि माडखोलकर' ) किंवा ज. रा. अक्कलवंत, अनंत आठवणकर ('एक विषय आणि पाच लेखण्या'–म्हणजे पुरुषोत्तम शिवराम रेगे, शांता शेळके, कृष्ण बळवंत निकुम्ब, राजा बढे आणि वि. म. कुळकर्णी) अशांचे लिखाण अजोड व अविस्मरणीय राहिले आहे. मधल्या कालखंडात त्या वेळची नवी, ताजी, बंडखोर मंडळी प्रस्थापित झालेली होती; पण त्यांच्याबरोबर 'अभिरुची' प्रस्थापित झाली नाही. तिच्या दुसऱ्या पर्वातदेखील तिच्यात रक्त वाहत होते ते आजचे, ताजे रक्त. ह्या काळात 'अभिरुची'तून पुढे आलेले लेखक म्हणजे चंद्रकांत प्रभाकर देशपांडे, विजयकुमार फरांदे, प्रकाश व अनिल बांदेकर, किरण नगरकर, दिलीप जगताप, 'उर्मिला सिरूर,' गजानन वडाळकर, त्र्यंबक खानोलकर वगैरे. 'अभिरुची' ही एक संस्था बनून बसली ह्याचे कारण फक्त वर दिलेल्या नामावलीत सापडणार नाही, कारण हे नियतकालिक केवळ चांगले साहित्य प्रसिद्ध करणारे व वाङ्मयचर्चेला वाव देणारे माध्यम नसून ते एक प्रभावी व्यक्तिमत्त्व असलेल्या, विद्वान पण मिस्कील व बोलक्या स्वभावाच्या मित्राप्रमाणे होते. 'अभिरुची'चे हे व्यक्तिमत्त्व तिच्या प्रत्येक सदरातून चमकायचे. अभिरुचीतील संपादकीये अत्यंत अनौपचारिक व मनमोकळी असायची. ज्याप्रमाणे स्वगताद्वारे एखाद्या नाटकातील पात्राची ओळख घडते त्याचप्रमाणे संपादकीयातून 'अभिरुची' ही चीज काय आहे हे कळायचे. हा झाला तिचा मनमोकळा बोलकेपणा. आत ठासून भरलेल्या उच्चभ्रू लेखनाशी खांद्याला खांदे घासत असायचे 'निषाद आणि शमा' यांचे रोचक व बोचक वादसंवाद. ह्या सदरा-मुळे मराठी विद्वानांच्या एका अत्यंत प्रिय अशा पारंपरिक समजुतीला पहिला धक्का पोचला. ती समजूत म्हणजे साहित्य आणि ललितकला हे गंभीर विषय असून त्यांच्या-विषयी बोलता-लिहिताना जाड भिंगाचा चष्मा चढवून चेहरा कायम लांब व सुतकी

---

१. 'अभिरुची'च्या पहिल्या पर्वातील या अजोड, संमिश्र वाङ्मयीन व्यक्तित्वामागे प्रत्यक्षात दडलेले तिघे 'पारलई'कार मित्रलेखक म्हणजे पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे, मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष व रा. वा. अलूरकर होत.

ठेवण्याची आवश्यकता असते. मनमोकळेपणा व विनोदबुद्धी ह्याला जोड होती परखड टीकेवरच्या प्रेमाची. हे फक्त छापल्या जाणाऱ्या लेखांतूनच समजत नसे तर ' मते आणि मतभेद ' ह्या खास वाचकांच्या मतांकरिता राखलेल्या सदरांतूनही. वाचकाने कितीही तुटून पडणारी पत्रे लिहिली तरी त्यांना ह्या सदरात वाव मिळत असे. एकंदर ' अभिरुची 'चे व्यक्तिमत्त्व निकोप, स्वच्छ, ताज्या खुलेपणाचे, मनमोकळ्या निःस्पृहतेचे व जात-प्रांत-गटबाजी धुडकावून लावणारे होते.

ह्या दिलखुलास नियतकालिकात साहजिकच कोणत्याही कोंदट, निनुळत्या, कोळिष्टकांनी गजबजलेल्या विचारांना जागा नसायची. साहित्य म्हणजे एका उंच मनोऱ्यात बसून निर्माण केलेली कलाकृती नसून ते एक आजच्या जगाची तीव्र जाणीव व्यक्त करणारे माध्यम आहे ह्याचा सतत पुरावा देत असे. साहित्याचा संबंध जीवनाशी आहे. म्हणूनच वेळोवेळी ' अभिरुची 'ने वैचारिक क्षेत्रात पाय रोवला. प्रासंगिकाच्या निमित्ताने वाचकांना आत्मचिंतन व मूल्यशोधन करायला लावण्याचे काम तिने अनेकदा पार पाडले आहे. या संदर्भात सहज आठवणारी उदाहरणे म्हणजे ' कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर आणि सदाशिव पेठ ' हा गाजलेला वाद ( १९४५ ); गांधी वधानंतरच्या महाराष्ट्रातील ब्राम्हणेतरांच्या ब्राम्हणावरील क्षोभासंबंधीची लेखमाला, ' असे का झाले व पुढे काय ? ' ( १९४८ ), ' घाशीराम कोतवाल 'च्या निमित्ताने जातीय भावना व बुद्धिमंत यांच्याविषयीचे विवेचन ' ( मार्च-एप्रिल व नोव्हेंबर-डिसेंबर १९७३ ) ही होत.

ज्याप्रमाणे साहित्याचा जीवनाशी हाडामासाचा संबंध आहे, त्याचप्रमाणे प्रत्येक प्रांतातील साहित्याचा राष्ट्रीय व त्यापुढे जागतिक साहित्याशी संबंध आहे ह्या विश्वासानुसार ' अभिरुची 'ने अनेक वेळा आपला विस्तार सहजतेने वाढवून पाब्लोनेरुज व पाब्लो पिकासो ह्यांना मराठी वाचकांच्या समोर उभे केले. अस्तित्ववाद (existentialism) ह्या विसाव्या शतकातील अत्यंत महत्त्वाच्या तत्त्वाचा मराठीत प्रथम तपास केला तो जुलै १९४८ च्या ' अभिरुची 'च्या अंकातील प्रा. दिनेश माहुलकर यांच्या लेखातून. पुढे तर ' अभिरुची 'ने १९६७–६८ मध्ये संपूर्ण ' अस्तित्ववाद ' विशेषांकच काढला. तशीच मराठीत तोवर अस्पृष्ट राहिलेल्या ' अतियथार्थवाद (surrealism) ह्या विषयाचीदेखील मे १९४३ च्या अंकात ' अभिरुची 'ने दखल घेतली.

' अभिरुची 'चे पहिले पर्व १९५३ साली संपले. तुटपुंज्या भांडवलांनी घातलेल्या मर्यादा प्रयोगशील साहित्याला वाहून घेतलेल्या 'लघु-नियतकालिकांना ' नवीन नाहीत. ह्या मर्यादांना टक्कर देत असताना नियमितपणाचा पहिला बळी पडतो. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे ' गुण गाईन आवडी 'तील ' इरावतीबाई : एक दीपमाळ 'मध्ये म्हणतात, ' अभिरुची ' हे " ... महाराष्ट्रातले पहिले अनियतकालिक. ऐसपैस

मासिकांच्या मानाने मिनीसुद्धा...साहित्यातल्या नव्या धिटाईने भरलेले ...तत्कालीन वडिलांच्या मताने काहीसे आगाऊ...'' ' अभिरुची 'च्या अनियमितपणाबद्दल वाचक तक्रार करायचे, पण तेदेखील कौतुकाने एखाद्या खट्याळ मुलाविषयी बोलावं त्याप्रमाणे. पण १९५३ साली आर्थिक परिस्थितीच्या पोटी ' अभिरुची 'चाच बळी पडला.

तेरा वर्षांनंतर, म्हणजे १९६६ साली अभिरुची पुन्हा उभी राहिली. उद्दिष्ट तेच, आशय तोच, साहजिकच ह्या दुसऱ्या पर्वात ' अभिरुची ' एका संपूर्ण नव्या पिढीशी संबंध जोडीत होती आणि तो संबंध जोडता जोडता साहित्यातील वडील मंडळींचा रोष पत्करण्याचे धैर्य दाखवीत होती. हे कार्य किती कठीण होते ते संपादकांच्या एखाद-दुसऱ्या टिपण-लेखातून स्पष्ट होते : '' प्रस्थापितांचा रोष असलेल्या नवीनांचे साहित्य व विचार यांना वाव देण्याचे, तसेच निर्भीड विचार-प्रदर्शनाचे मूल्य जपता जपता अनेक उच्चपदस्थांचा ' अहं ' दुखावण्याचे, अशी दोन महत्पापे ' अभिरुची 'कडून घडली. '' या कबुलीनंतर आपली भूमिका ते मांडतात : '' दोन तपांपूर्वीच्या नव्यांची बंडखोरी ज्या नियतकालिकातून व्यक्त झाली त्याने तीच भूमिका आजच्या नव्या व ताज्या विचारांबाबत ठेवली नसती तरच विपरीत घडले असते.'' ( दिवाळी अंक, १९७० ) ह्यातून एक गोष्ट स्पष्ट होते की, ' अभिरुची 'ने केवळ नावाला कधीच मानले नव्हते व आताही मानणार नव्हती. ज्याप्रमाणे पहिल्या पर्वात प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी या ख्यातनाम विद्वानाच्या ' मराठी व्युत्पत्ति-कोशा 'चे डॉ. नारायण गोविंद कालेलकर या तोवर अप्रख्यात भाषातज्ज्ञाने केलेले परखड परीक्षण प्रसिद्ध करून अभिरुचीने गडबड उडवून दिली, त्याचप्रमाणे दुसऱ्या पर्वात साहित्य अकादमी बक्षीस मिळालेल्या ' व्यक्ती आणि वल्ली 'च्या परीक्षणाच्या निमित्ताने श्री. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे यांच्या वाङ्मयीन व्यक्तित्वाचे दिलीप पुरुषोत्तम चित्रे या तरुण लेखकाने केलेले विश्लेषण छापून उडवली. नव्या लेखकांच्या तथाकथित अश्लील साहित्यावर आचार्य अत्र्यांसारख्यांनी झोड उटविताच 'अभिरुची'ने या तोवर जवळजवळ निषिद्ध विषयावर चक्क विशेषांकच काढून त्यावर शास्त्रीय व सांस्कृतिक दृष्ट्या मराटीत प्रथमच चर्चा घडवून आणली. इतकेच नव्हे तर ज्या दांभिक व दुटप्पी वृत्तीचे प्रतिनिधित्व अत्रे करीत होते तिचे पुरेपूर माप सप्रमाण त्यांच्या पदरात टाकण्याचे धैर्यही दाखविले.

सुरुवातीस म्हटल्याप्रमाणे ' अभिरुची 'ने केलेल्या कामगिरीचे दोन भाग पडतात : पहिला भाग म्हणजे उत्कृष्ट साहित्य प्रसिद्ध करणाऱ्या, वाचकाशी सदैव एकनिष्ठ राहणाऱ्या व त्याचा बौद्धिक विकास करीत राहणाऱ्या एका नियत-कालिकाकडून अपेक्षित असलेली कामगिरी. ह्या कामगिरीचा आढावा थोडक्यात आतापर्यंत घेतला. पण ' अभिरुची 'ने आरंभलेले काम इतक्यावर आटोपले नाही. नुसतेच आरामखुर्चीतील टीका-संवाद करून ती शांत बसली नाही. अनेक वेळा तिने

नियतकालिकाच्या नियोजित क्षेत्राबाहेर पाय टाकून एका जिवंत सामाजिक घटकाची कामगिरी बजावली.

काही लब्धप्रतिष्ठितांच्या दबावामुळे सरकारी सेन्सॉरचा ससेमिरा जेव्हा श्री. विजय तेंडुलकरांच्या ' सखाराम बाईंडर ' मागे लागला होता, त्या वेळी विचार-स्वातंत्र्याच्या क्षेत्रातल्या या अन्यायाचा पाठपुरावा ' अभिरुची 'ने उच्च न्यायालयात धाव घेऊन केला आणि नाटकाच्या पुढील न्यायालयीन झगड्याच्या यशाची पार्श्वभूमी तयार केली. (भारताच्या न्यायालयीन इतिहासात एकाही भाषेतल्या कोठल्याही नियतकालिकाने असे केल्याचे ऐकिवात नाही.)

महाराष्ट्र राज्याच्या साहित्य व संस्कृती मंडळाच्या अधिकाराखालील विश्वकोश कार्यालयाविरुद्ध अन्याय्य बडतर्फीचा जो दावा कै. दि. के. बेडेकरांनी न्यायालयात गुदरला होता, त्याबाबत, अखिल मराठी साक्षर जगतात अळीमिळी असताना केवळ ' अभिरुची 'नेच काय ते त्या वेळी त्यांच्याविषयी सहानुभूतीपर स्फुट लिहिले. तिच्याविषयीची कृतज्ञता आणि इतरांच्या मौनाविषयी खंत स्वतः बेडेकरांच्या बोलण्यात व्यक्त होई.

प्रत्यक्ष कृतीच्या संदर्भात, ' अभिरुची ' ने गेल्या वर्षी, वाईट आर्थिक स्थितीत अकाली गेलेल्या चिंतामण त्र्यंबक खानोलकर यांच्या कुटुंबीयांच्या मदतीसाठी एक अभूतपूर्व स्वरूपाचा कार्यक्रम योजिला होता. ह्या कार्यक्रमात प्रमुख लेखक कलावंतांनी खानोलकरांच्या साहित्यातील स्वतःच्या आवडीचे भाग वाचून दाखविले.

नियतकालिकांच्या कर्तव्यक्षेत्राबाहेरचे हे कर्तृत्व ' अभिरुची 'च्या स्वभावानुसार होते. या नियतकालिकाचे संपादक या मासिकाकडे केवळ चांगले साहित्य प्रसिद्ध करणारे माध्यम एवढ्याच पुरते बघत नसून, निर्भय विचारस्वातंत्र्याचे मूल्य निःपक्षपातीपणे विना-तडजोड स्वीकारणारे, प्रथित-अप्रथित यशाच्या निःसंकोच विचार प्रकटनाचेच नुसते नव्हे, तर वेळी प्रत्यक्ष कृती करण्याचेही केंद्र ( nucleus ) असेच त्याला मानीत आले आहेत.

दुसऱ्या पर्वातील ' अभिरुची ' म्हणजे एकखांबी तंबू होता. त्याचे एक संपादक, पुरुषोत्तम आत्माराम चित्रे हे अखंड धावपळ करून त्याचे अंक धिटाईने झगडत काढीत राहिले, पण ते थोडीच वर्षे. सप्टेंबर १९७४ च्या अंकात आपले संपादकीय 'जरा महत्त्वाचे; कारण अखेरचे' लिहून स्वतः पुरते 'अभिरुची 'चे संस्थापक-संपादक, आपल्या वयाची साठ वर्षे व ' अभिरुची ' च्या सेवेची, दोन्ही पर्वातील मिळून उणीपुरी १७-१८ वर्षे संपवून स्वेच्छेने निवृत्त झाले आहेत. त्यांनी नव्या मंडळींना आवाहन केले आहे : "आज ' अभिरुची ' अशा एका किंवा अधिक व्यक्तींच्या शोधात आहे की ज्यांच्याकडून तिची आजवरची character व आजवरचे spirit अबाधित राखले जाऊन तिचे कार्य अखंडित चालू राहील. " हेच आवाहन पुन्हा त्यांनी मुंबई

दूरदर्शनावर ता. ३ डिसेंबर १९७५ रोजी दिलेल्या मुलाखतीत केले आहे. मध्यंतरी आणीबाणीच्या अडचणी असल्यामुळे असावे, पण या आवाहनाला प्रतिसाद मिळाल्याचे दृश्य चिन्ह अजून तरी दिसत नाही. कोणी सांगावे, अपरिहार्य कारणांनी कमी-अधिक काळापुरती अनेकदा खंडित झालेली 'अभिरुची' ताज्या उत्साहाने पुन्हा आपले अत्यावश्यक व वैशिष्ट्यपूर्ण कार्य चालू ठेवायला आणखी कोणाच्यातरी जिद्दीने लवकरच निघूही लागेल – निघायलाच हवी.

■

## साहित्य संमेलन कशासाठी ?

केवळ वाङ्मय-विकसनाच्या दृष्टीने साहित्य संमेलनाचे महत्त्व व उपयुक्तता किती असते, याचे विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नाही. ग्रंथकर्ते, प्रकाशक व त्यांचे आश्रयदाते आणि त्यांच्या कृतीचे भोक्ते यांनी एके ठिकाणी जमून परस्परांचे विचार जाणून घ्यावे, एकमेकांची सुखदुःखे, आशा व उमेदी समजून घ्याव्या आणि भाषेच्या उन्नतीसाठी युक्त उपायांची योजना करावी.

पण याशिवाय साहित्य संमेलनापासून दुसऱ्याही अनेक इष्ट गोष्टी साधतात. भाषाजननी ही देशजननीइतकीच अतिपूज्य देवता आहे. राष्ट्राचा आत्मा राष्ट्राच्या वाङ्मयात प्रतिबिंबित होत असतो. भाषेची उन्नती राष्ट्राच्या उन्नतीची निदर्शक असते व भाषेचा ऱ्हास राष्ट्रीय अवनतीची साक्ष देत असतो. म्हणून साहित्य संमेलनाच्या द्वारे वाङ्मयोन्नती करण्याच्या प्रयत्नांनी राष्ट्राच्या मनोवृत्ती उच्च करून त्याची अनेकविध प्रगती साधता येते.

साहित्य संमेलनाच्या योगे दुसरी महत्त्वाची गोष्ट साध्य होते, ती म्हणजे मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व लोकांचे ऐक्य ही होय. ग्वाल्हेर, इंदूर, माळवा, सागर, मध्यप्रांताचा दक्षिणेकडील भाग, वऱ्हाड, महाराष्ट्र, कोकण, बेळगाव, धारवाड इत्यादी कर्नाटकचे भाग, गोवे वगैरे अनेक भागांत मराठी भाषेची वसतिस्थाने आहेत. त्यांच्यात असावा तसा एकोपा नाही. हे मराठ्यांचे ऐक्य पुन्हा घडवून आणण्याचे कार्य साहित्य संमेलनाच्या द्वारे अनायासे होऊन ह्या ऐक्यापासून मराठी भाषेच्या उन्नतीस व विकसनास अमूल्य साह्य होईल, हे उघडच आहे.

–'विविध ज्ञान विस्तार', नोव्हेंबर १९१२. (अकोले येथे भरलेल्या सातव्या 'महाराष्ट्र साहित्य संमेलना'चे 'विहंगम पर्यालोचन', 'महाराष्ट्र साहित्य परिषद इतिहास' या ग्रंथातून उद्धृत.)

७

# ' मुद्रा 'मधील कलाविचार

प्रभाकर लक्ष्मण गावडे

' व्हीनस प्रकाशन 'चे श्री. स. कृ. पाध्ये हे मराठी वाङ्मयातील दर्जेदार ग्रंथांचे मातबर प्रकाशक होत. ' व्हीनस प्रकाशन 'तर्फे ग्रंथ प्रसिद्ध होण्याचा मान मराठीतील अनेक नामवंत लेखकांना लाभलेला आहे. ग्रंथ प्रसिद्धीकरणामागील श्री. पाध्ये यांची रसिक व चोखंदळ वृत्ती अशा अनेक ग्रंथांतून दिसून येते. उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीसाठी नवोदित लेखकांना प्रेरणा मिळावी, नव्या-जुन्या लेखकांच्या चर्चेतून लेखकांच्या विकारविचारांना नवे धुमारे फुटावेत म्हणून श्री. पाध्ये यांनी ' व्हीनस-चर्चा मंडळ ' चालविले आणि ' व्हीनस ' लेखकांचे स्नेहसंमेलनही घडवून आणले. श्री. पाध्ये यांचा सतत शोध चालू होता अस्सल वाङ्मयाचा. पाध्यांची झेपही फार मोठी. ' सर्वच भारतीय भाषांसंबंधी पुस्तके प्रकाशित करण्याची ' एक योजना त्यांनी आखली होती. त्या दिशेने थोडी वाटचालही केली. ' मुद्रा ' किंवा पुढे नवनामकरण केलेले ' शब्द-मुद्रा ' हे त्रैमासिक श्री. पाध्ये यांनी सुरू केले ते या अस्सलाचा शोध घेण्याच्या ध्यासातूनच. जानेवारी १९६६ मध्ये स्वतः संपादित केलेल्या ' मुद्रे 'च्या पहिल्या अंकात पाध्यांनी लिहिले आहे, " कला आणि विचार यांच्या क्षेत्रांत अस्सलाचा शोध घेणे व अस्सलाची जपणूक करणे हा ' मुद्रे 'चा उद्देश आहे. " या आत्मनिवेदनात श्री. पाध्ये यांनी अशा प्रकारे अस्सलाचा शोध घेणाऱ्या ' विविध ज्ञान विस्तारा 'पासून तो ' सत्यकथे 'पर्यंतच्या दर्जेदार नियतकालिकांच्या परंपरेचा कृतज्ञपणे निर्देश केला आहे.

कला व विचार या क्षेत्रांत अस्सलाची नवनिर्मिती करणाऱ्या नव्या-जुन्या लेखकांच्या शोधात श्री. पाध्ये यांनी पुढे तीन वर्षे भ्रमंती केली. श्री. अ. ज. करंदीकर, श्री. दि. वि. काळे, श्री. व. शां. देसाई यांसारख्या जुन्या लेखकांकडून संशोधनपर आणि विचारप्रवर्तक साहित्य रसिकांपुढे ठेवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. ' मेनका आणि विश्वामित्र ' या संशोधनपर लेखात श्री. अ. ज. करंदीकर यांनी इराक, ईजिप्त, बाबिलोनिया, ग्रीस इत्यादी देशांतील मेनकेची विविध स्वरूपे कशी होती यांचे साधार वर्णन करून अखेरीस तिच्या अस्तित्वाच्या काळाचा निर्देश केला आहे. श्री. दि. वि. काळे यांनी शिवचरित्राचे लेखन करताना संशोधनाच्या प्रगतीचे दाखविलेले चार टप्पे उल्लेखनीय आहेत. आणि शिवचरित्रलेखनाचा आतापर्यंतचा आलेख काढून त्यांनी

शेवटी असा निष्कर्ष काढला आहे की, ' उत्कृष्ट आणि विपुल बहुरंगी विश्वसनीय साधने आणि त्यांचा योग्य उपयोग करू शकणारा लायक, रसिक, सहानुभूतीचा आणि ' शास्त्रज्ञ ' इतिहासलेखक यांचा संयोग अजून झालेला नाही ! '

' मुद्रे 'त ज्या दोन प्रमुख लेखमाला अतिशय गाजल्या त्या डॉ. ज. वा. जोशी आणि प्रा. श्री. व्यं. वोकील यांनी लिहिल्या होत्या. विसाव्या शतकातील अग्रगण्य फ्रेंच साहित्यिक आल्बेर कामू यांच्या चरित्राचा व त्यांच्या साहित्याचा सर्वंकष परिचय डॉ. ज. वा. जोशी यांनी या लेखमालेतून करून दिला आहे. आल्बेर कामू यांच्या कादंबऱ्या, कथा, वृत्तपत्रांतील लेख आणि तत्त्वचिंतनपर लेखन या सर्वांची अत्यंत सरस समीक्षा वाचकांना येथे आढळेल. प्रा. श्री. व्यं. वोकील यांनी ' एस्थेटिक्स 'चा (' सौंदर्यशास्त्र ' हा शब्द श्री. वोकील यांना अपुरा वाटतो) शुद्ध विचार ' या जटिल विषयावर तीन लेखांक लिहून तो विषय आणि अभिव्यक्तीची भाषा यांवरील आपले प्रभुत्व सिद्ध केले आहे. ' मुद्रे 'तून या लेखमाला प्रसिद्ध करून श्री. पाध्ये यांनी विचारक्षेत्रातील अस्सलाबद्दलची जाण योग्य प्रकारे दाखवून दिली आहे.

ज्येष्ठ लेखकांबरोबरच कनिष्ठ लेखकांनाही प्रसिद्धीच्या प्रकाशात आणण्याचा श्री. पाध्ये यांनी केलेला प्रयत्न मराठी सारस्वताला वर्धमान करणारा ठरावा. या दृष्टीने श्री. पाध्ये यांनी दिलेली लेखकनामावली पाहण्यासारखी आहे. या संदर्भात श्री. पाध्ये लिहितात, "' मुद्रे 'चे काम योग्य मार्गाने झाले याचे एक लक्षण म्हणजे ' मुद्रे 'त एकत्र आलेली जुनी-नवी नावे. अ. ज. करंदीकर, दि. वि. काळे, आनंद यादव, गं. ना. जोगळेकर, अरविंद कुलकर्णी, सु. रा. चुनेकर, चंद्रशेखर वर्वे, विजया वाडेकर, स. शि. भावे, अ. म. जोशी, अनुराधा पोतदार, सरिता पदकी, प्रभा गणोरकर, प्रियदर्शन पोतदार, शिवराज गोर्ले, विनय हर्डीकर, श्रीनिवास साठे या नावांत ज्येष्ठ–कनिष्ठ, परिचित अपरिचित अशी नावे एकत्रित आलेली दिसतात. यांतील सात-आठ जणांचे लेखन तर ' मुद्रे 'ने प्रथमच प्रकाशित केले ... १७ ते २२ वर्षे वयाच्या अंतरातील अगदी नव्याने फुटणाऱ्या धुमाऱ्यांचे हे पहिले आविष्कार आहेत."

' मुद्रे 'तील संपादकीय टीपा-टिपणीत प्रामुख्याने साहित्यविषयक प्रश्नांची सविस्तर चर्चा करण्यात आलेली आहे. हैदराबाद, भोपाळ व काटोल येथे भरलेल्या मराठी भाषिकांच्या साहित्यसंमेलनांतून जे वाङ्मयीन प्रश्न चर्चिले गेले त्यांची योग्य दखल ' मुद्रे 'ने ' संपादकीय ' या सदरात घेतली आहे. पुण्याच्या विभागीय साहित्य-संमेलनात संशोधनाच्या प्रश्नावर जी चर्चा झाली तिची साधकबाधक बाजू वाचकांपुढे मांडण्यात आली आहे. ग्रंथांना मिळणाऱ्या सरकारी पारितोषिकांबद्दल केलेली चर्चा मात्र काही व्यक्तिगत उल्लेखांबाबत निकोप वाटत नाही.

काही उत्कृष्ट ग्रंथांवरील वाङ्मयीन परीक्षणे ही ' मुद्रे 'च्या यशातील जमेची मोठी बाजू होय. ' आजचे मराठी ग्रंथपरीक्षण ' हे योग्य प्रकारे व्हावे असा प्रयत्न श्री. पाध्ये

यांनी जाणीवपूर्वक केला आहे. त्या परीक्षणांना योग्य दर्जा व दिशा मिळावी यासाठी मराठीतील समीक्षक व सृजनशील लेखक यांची चर्चा श्री. पाध्ये यांनी घडवून आणली; आणि ‘ मुद्रे ’तून प्रसिद्ध केलेल्या ग्रंथपरीक्षणाचा एक वस्तुपाठ मराठी वाचकांपुढे ठेवला. ही सर्व परीक्षणे वाचकांनी मुळातून वाचावी अशी शिफारस येथे केली तर ती उपयुक्तच ठरेल.

कला व विचार या क्षेत्रांत अस्सलाचा शोध घेण्याची श्री. पाध्ये यांची प्रतिज्ञा मात्र तीन वर्षांच्या कालावधीनंतर भंग पावली. १९६६ ते १९६८ असे तीन वर्षांचे आयुष्यमान ‘ मुद्रे ’ला लाभले; आणि ‘ मुद्रे ’च्या अवतारसमाप्तीच्या शेवटच्या अंकावर शब्द मुद्रित करताना श्री. पाध्ये यांना विषादाने लिहावे लागले, “ चांगली उमेद, शिस्तबद्ध उपक्रमशीलता आणि आर्थिक स्थैर्य यांची सांगड नेहमी जमतेच असे नाही. अशी सांगड जमलीच तर ती दीर्घ काळ टिकणे हे अधिकच कठीण. तेव्हा अपवादात्मक असे घडले नाही याचा विषाद प्रमाणाबाहेर वाटू शकत नाही. ” या विषादातही श्री. पाध्ये यांना एक मर्यादित समाधान वाटते ते अस्सलाचा शोध घेण्याचे उद्दिष्ट कायम ठेवल्याबद्दल. सेनापती बापट यांनी आपल्या ‘गुड बुक्स ’ या कवितेत म्हटल्याप्रमाणे ‘ मुद्रे ’चे अंक वाचताना वाचक आजही म्हणतील—

Good Books are a treasure great
Good Books they give uplifting joy.

■

## कथेची कसोटी

नवकथेचं स्वरूप लवचिक आहे. जीवनाच्या काही नव्या अनुभूतीतून ती निर्माण झाली आहे. तिच्यातील प्रतिमा निराळ्या आहेत म्हणून ती नवी नाही, तर तिच्यातील अनुभवांची गुंफणच निराळी आहे, म्हणून तिच्यातील प्रतिमा निराळ्या आहेत

नवकथा म्हणजे काही जुन्या कथेच्या वर्तुळाशेजारी काढलेले एक छोटेसे वर्तुळ नव्हे. नवकथा हे एक मोठे वर्तुळ आहे. जुन्या कथेचे वर्तुळ हा या मोठ्या वर्तुळाचा लहानसा भाग आहे. जुन्या कथेचे वर्तुळ लहान होते, इतकेच नव्हे तर चुकीच्या मध्यबिंदूच्या भोवती ते आखलेले होते. साहित्य आणि लघुकथा या विषयीच्या चुकीच्या कल्पनांवर जुनी कथा आधारलेली होती ह्या उलट नवकथा ही कथा आणि साहित्य यांविषयीच्या अधिक शुद्ध आणि व्यापक कल्पनांवर आधारलेली आहे.

—गंगाधर गाडगीळ

( खडक आणि पाणी, पॉप्युलर, मुम्बई, १९६०, पृ. १४९ व १६१ )

८

# 'आनंदवन' : एक 'अनिरुद्ध' उपक्रम

## रवींद्र घवी

'आनंदवन' / संपादक : अनिरुद्ध कुलकर्णी / सहसंपादक : अनिल किणीकर / कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०' ही मराठीतील मंत्राक्षरे सध्यातरी इतिहासजमा झाली आहेत. 'आनंदवन' चे प्रकाशन स्थगित झाले आहे. हे मानव्यविद्याविषयक त्रैमासिक जानेवारी १९७३ मध्ये सुरू झाले आणि सप्टेंबर ७४ मध्ये बंद पडले. त्याचे एकूण सहाच अंक निघाले. म्हणजे अगदी अल्प अवधीतच या नियतकालिकाचा अंत झाला. परंतु या अल्पावधीतच 'आनंदवन'ने आपल्या वाचकांत खूप आस्था निर्माण केली होती आणि स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण प्रतिमा निर्माण केली होती. म्हणूनच आज मराठीतील मातबर नियतकालिकांचा विचार करताना, 'आनंदवन'चा विसर पडू शकत नाही. 'आनंदवन'चे प्रकाशन खंडित झाले आणि आस्थेवाईक वाचकांना कायमची चुटपूट लागून राहिली. तसे पाहू गेल्यास या नियतकालिकाने आपल्या प्रसिद्धीचा गाजावाजा केला नव्हता. 'ललित'चा अपवाद वगळल्यास अन्य कुणा नियतकालिकाने त्याची दखल घेतली नव्हती. पण ज्यांच्या हाती 'आनंदवन' पडले त्यांनी त्याचे पुरेपूर हार्दिक स्वागत केले. हा उपक्रम दीर्घकाळ चालू राहावा असेच त्यांना वाटले.

'आनंदवन'चे दर्शनी स्वरूपच असे भारदस्त होते. सामान्यतः आपल्याकडील वाङ्मयीन अथवा संशोधन-कालिके आकर्षक नसतात. (अलीकडे ही परिस्थिती थोडी पालटलेली दिसते.) परंतु 'आनंदवन'चे निर्मितिमूल्य उत्कृष्ट होते. त्याचे सर्व अंक कल्पना मुद्रणालयात छापले गेले होते. टाईप मोटा आणि सुबक होता आणि कागद दर्जेदार होता. त्या वेळचा अनिरुद्ध कुलकर्णींचा उत्साह असा दांडगा होता की, त्यांनी अंकांचे निर्मितिमूल्य राखताना खर्चाचा कोणताही विचार केला नसावा. मला चांगले आठवते, त्या वेळी अनिरुद्ध समर्थांच्या चरित्राने आणि साहित्याने भारावून गेले होते. समर्थांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेल्या प्रत्येक स्थानाला ते भेट देत होते आणि समर्थांचे वाङ्मय हे तर त्यांचा श्वासोच्छ्वास झाले होते. त्या समर्थ रामदासांचे 'आनंदवनभुवनी' हे प्रख्यात काव्य आहे. त्यातील 'आनंदवन' हे शब्द संपादकांनी या त्रैमासिकासाठी निवडले होते. यासंबंधी खुलासा करताना

अनुक्रमणिका

पहिल्याच अंकात असे म्हटले आहे, ‘ आनंदवनभुवन ’ ही समर्थ रामदासांची अतिशय सुप्रसिद्ध कविता आहे. भावी महाराष्ट्राचे (आणि भारताचे) चित्र त्यात समर्थांनी रेखाटले आहे. एक ‘युटोपिआ’च जणू चित्रित केला आहे. आपल्या या पहिल्याच संपादकीय स्फुटाचा समारोप करताना संपादकांनी म्हटले आहे, “ ‘समर्थांच्या पवित्र स्मरणाने सुरू झालेली प्रस्तुत ‘ चळवळ ’ वृद्धिंगत आणि सुफलदायी होईल अशी आशा व विश्वास वाटतो.” आधुनिक मानव्यविद्यांची उपासना करणारी एक सामर्थ्य-संपन्न चळवळ ‘ आनंदवन ’च्या रूपाने सुरू व्हावी अशी आकांक्षा होती. ह्या उपक्रमाच्या उभारणीला सहकार्य देणाऱ्या बारा ‘निकटवर्ती स्नेह्यां’चा उल्लेखही त्या स्फुटात आहे. परंतु प्रत्यक्षात हे सहकार्य कितपत मिळाले कोण जाणे ! कारण दुसऱ्या वर्षाच्या पहिल्या अंकात संपादकांनी म्हटले आहे, “ काम हाती घेताना, समर्थ रामदासांनी त्यांची ‘ आनंदवनभुवन ’ ही कविता ज्या पार्श्वभूमीवर लिहिली, तशीच पार्श्वभूमी ‘ आनंदवन ’ लाही लाभणार आहे अशी कल्पना सुतरामही आली नाही. तरी मनाची टवटवी कायम आहे.” पुढे कागदाचा भाव इतका वाढला आणि अभाव इतका जाणवू लागला की, ‘आनंदवन’चे प्रकाशन स्थगित करणे भाग पडले. एका महत्त्वाकांक्षी आस्थापूर्ण उपक्रमाला विराम मिळाला. या उपक्रमाच्या समग्र यशापयशाचा विचार या छोट्या लेखात करणे शक्य नाही. केवळ काही वैशिष्ट्ये इथे नोंदविता येतील.

केवळ मानव्यविद्यांना वाहिलेले असे दर्जेदार नियतकालिक आपल्याकडे नाही ही उणीव भरून काढण्याचा प्रयत्न ‘ आनंदवन ’ने केला. तो सातत्याने दीर्घकाळ चालू राहू शकला नाही ही दुःखाची बाब म्हणावी लागेल. कारण हा उपक्रम चालू राहता तर ‘ नवभारत ’ किंवा ‘ समाजप्रबोधन पत्रिका ’ यांच्यासारखे दर्जेदार नियतकालिक म्हणून ‘ आनंदवन ’लाही मान्यता मिळाली असती आणि अभ्यासपूर्ण लेखन करणाऱ्या, मानव्यविद्यांच्या तरुण विद्वानांना चांगले व्यासपीठ लाभले असते.

‘ आनंदवन ’ हे काही वाङ्मयीन नियतकालिक नव्हते. त्यामुळे मानव्यविद्यांच्या कक्षेत येणाऱ्या अनेक शास्त्रांवरील लेख त्यात प्रसिद्ध होत असत. दोन वर्षांतील सहा अंकांत असे एकूण ४७ लेख प्रसिद्ध झाले आहेत. तत्त्वज्ञान, शिक्षण, अर्थशास्त्र, शेती, पुराणवस्तुसंशोधन, राज्यशास्त्र, इतिहास, समाजशास्त्र, नागरिकशास्त्र, साहित्य, समाजजीवन, वेदविद्या, धर्म, सौंदर्यशास्त्र इ. विविध शास्त्रांवर ते आधारित आहेत. शिवाय या सर्व लेखांचे इंग्रजी सारांशही दर अंकात शेवटी देण्यात आले आहेत. हे लेखन संपादित करणारा संपादकांचा दृष्टिकोनही मौलिक आहे. कालोचित संदर्भ सोडून केवळ ‘ ॲकॅडेमिक ’ स्वरूपाचे हे नियतकालिक होऊ नये असा प्रयत्न दिसतो. ग्रामीण नेतृत्व, पुण्यातील झोपडपट्टी, जुळी मुंबई, गरिबी आणि आधुनिकीकरण, अस्पृश्यतेची समस्या इ. लेख-शीर्षकांवरून विषयांचे स्वरूप वाचकांच्या ध्यानी येईल.

आजच्या काळातील आपल्या सभोवारच्या समाजजीवनातील प्रश्नांचा शास्त्रीय दृष्टिकोनातून विचार मांडावा असा हेतू स्पष्ट होतो. मराठीसारख्या प्रादेशिक भाषेतून मानव्यविद्यांचा विकास होण्यासाठी आपल्या समाजाच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांचा विचार होणे अगत्याचे आहे. 'आनंदवन'च्या संपादनामागे हेच सूत्र होते. त्याचबरोबर 'इंग्रजीतील चार अक्षरी शब्द', 'प्रबोधन' इ. अनुवादित लेखांचाही उल्लेखकरता येईल. पाश्चात्त्य विचारवंतांचे विचार आपल्या वाचकांपुढे ठेवण्याचा हा प्रयत्न होता. त्याचे महत्त्व वेगळे सांगायला नको.

'आनंदवन' च्या लेखक-परिवारात प्रभाकर पाध्ये, रा. चिं. ढेरे, नी. वि. सोवनी असे प्रख्यात विद्वान आणि विचारवंत होते. तसेच शरद देशपांडे, अनिल किणीकर, जयंत देव, ग. उ. थिटे इ. तरुण संशोधकही होते. ही तरुण पिढी आज स्वतंत्रपणे आपल्या लेखनातील गुणवत्तेच्या जोरावर मान्यता पावत आहे.

सामान्यतः आपली नियतकालिके एका ध्येयवादी दृष्टीतून सुरू होतात आणि आर्थिक पेचप्रसंगात सापडून पुढे तडजोडी करून आपले अस्तित्व टिकवण्याचा प्रयत्न करतात. या प्रयत्नात अपयश येऊन अनेकदा ती बंदही पडतात. 'आनंदवन'-ही तसेच बंद पडले. परंतु त्याने आपल्या मूळ भूमिकेशी कोणतीही तडजोड केली नव्हती आता कागदाचा भाव आणि अभाव यांबाबत परिस्थिती खूपच सुधारली आहे. 'आनंदवन'चे खंडित झालेले प्रकाशन पुन्हा सुरू झाल्यास मानव्यविद्यांच्या क्षेत्रात ते वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी पार पाडील असा विश्वास वाटतो.

★

### विद्यापीठांची शक्तिपीठे व्हावीत

सांप्रत जीवनकलह अत्यंत प्रखर झाला आहे. उपाशी पोटी माणूस उभा तरी कसा राहील ? ज्ञानोपासना तरी कशी साधेल ? दुपारची भ्रांत सर्वांना धास्तावून सोडीत आहे. विद्यापीठाच्या दारी जो कोणी येईल त्याला ज्ञानाची भिक्षा मुक्त हस्ताने देता आली पाहिजे. तेथे जात, धर्म असल्या कसल्याही कृत्रिम अडचणी आड येऊ देता कामा नये. तथापि दिले, देऊ केले, ते घेता आले पाहिजे ! पात्रतेचा विचार उडवून लावता येत नाही. पदवी नको, नोकरी हवी, ही घोषणा समजण्यासारखी आहे. पण विद्यापीठ हे काही नोकरीपीठ नाही. हे देऊळ आहे; ही खानावळ नाही, हेही समजले पाहिजे. आपल्या विद्यापीठांची शक्तिपीठे झाली पाहिजेत. ती ज्ञानार्जनाने होतील.

**दत्तो वामन पोतदार**

( पुणे विद्यापीठ रौप्य महोत्सव स्मरणिका, मार्च १९७४; पृ. ८ )

१

# ' जिप्सी 'च्या वाटा

आनंद माडगूळकर

गडद अंधारात कोणतीही दिशा माहीत नसताना व कोणतीही शिदोरी जवळ नसताना चालावयास सुरुवात करावी आणि योग्य वाट पावलांसमोर आपोआप उलगडत जावी असे ' जिप्सी 'च्या बाबतीत नेहमीच घडले आहे. न पेक्षा कात्रजच्या हिरव्या वनराईतून भटकताना आम्हा तरुण पोरांना पडलेल्या एका रम्य दिवास्वप्नाचे रूपान्तर एका सुसंघटित आणि योजनाबद्ध अशा नियतकालिकात होणे शक्यच नव्हते.

' जिप्सी ' या नावाबद्दलसुद्धा सुरुवातीला अनेकांनी गैरसमज करून घेतला होता. वस्तुतः या नावाचा हिप्पी संप्रदायाशी किंवा तथाकथित संतप्त तरुणांच्या ' लिट्ल मॅगझिन्स 'शी दूरान्वयानेसुद्धा संबंध नव्हता. ' जिप्सी ' भटक्या होता तो फक्त नावीन्याच्या, सौंदर्याच्या शोधापुरता. आकस्ताळ्या संतापाने जगाच्या, समाजाच्या आणि परंपरेच्या विरुद्ध जिप्सीने आपले ऊर कधीच बडवून घेतले नाही. या देशाच्या महान परंपरेचे, मराठी सारस्वताचे ऋण जिप्सीने आनंदाने मान्य केले आहे, त्याचा अभिमान बाळगला आहे. श्रीधर माडगूळकरांनी लिहिलेली संपादकीये म्हणजे या ऋणांना जिप्सीने दिलेल्या ' सानंद ' मान्यता होत्या. एका संपादकीयात ते म्हणतात, " प्रतिथयश साहित्यिकांनो, तुमच्यामुळेच मराठी सारस्वत बारा महिने तेरा काळ बहरत राहिले आहे आणि खरोखरीच वि. शं. पारगावकर, उद्धव ज. शेळके, द. मा. मिरासदार, व. पु. काळे आदी अनेकांनी जिप्सीच्या तांड्यात अग्रदूताचा मान मिळविला आहे. एवढेच नव्हे तर ' सोबत 'कारांना चक्क एक कविता लिहायलासुद्धा जिप्सीने भाग पाडले होते.

' जिप्सी 'चा प्रथमांक प्रकाशित होण्याचा काळ १९७०-७१ मधला. आज प्रामुख्याने चर्चिल्या जाणाऱ्या ' दलित साहित्य 'चा मागमूससुद्धा तेव्हा नव्हता. ( निदान आज मिळते ते सन्माननीय स्थान त्याला मिळाले नव्हते.) इतकेच नव्हे तर महाराष्ट्रातील काही मोजकी शहरे सोडल्यास, इतर ठिकाणीही बुद्धीच्या ठिणग्या उडू शकतात, प्रतिभेचे निखारे फुलू शकतात याची कुणाला जाणीवच नव्हती. जणू प्रतिभा ही एका ठराविक परिसरात मर्यादित झाली होती. त्या परिसराचे राग-लोभ त्या स्फुलिंगाची धग ठरवीत होते. पाऊस संपल्यानंतर ठिकठिकाणी छोटीछोटी डबकी

अनुक्रमणिका

साचावीत, त्यावर हिरवेगार शेवाळे जमावे अशी काहीशी आत्मसंतुष्ट कोंडी निर्माण झालेली होती.

ही कोंडी फोडण्यासाठी ' जिप्सी 'ने महाविद्यालयीन कथा-काव्यस्पर्धा जाहीर केली. ही स्पर्धा पुण्यामुंबईच्या छानछोक्यांपुरती नव्हती. पार नांदेडपासून परळी वैजनाथ-पर्यंत जिप्सीची हाक जाऊन पोहोचली.

—आणि प्रतिसाद मिळाला तो आम्हांला थक्क करणारा होता. ' जिप्सी 'च्या ऊबदार सान्निध्यात प्रतिभेचे कोवळे अंकुर फुलत होते, अर्ध्या-कच्च्या कल्पना गाभुळत होत्या. संताप वैफल्य कडाडून उठत होते.

एका संतप्त कवीने समाजाला कडाडून बजावले :

स्वर्गात देव सडून चालला; अप्सरांचा लिलाव काढा;
कोणी सूर्य झाकून टाका; मी आत्मा विकणार नाही.

तर दुसऱ्याला सुंदर खिडकीतून कुरूप जग दिसले.

स्काय-स्क्रेपर इमारतीच्या खिडक्यांना
सुंदर काचेची झापडं लावायची
म्हणजे मग तुम्हांला, तुमच्या बिल्डिंगखाली पसरलेली
छिनाल झोपडपट्टी सुंदर...सुंदर दिसेल.

पण समाजाच्या रुळल्या वाटा बदलून टाकण्याची हिंमत काहींच्यात होती. चंद्र-भूषण कुलश्रेष्ठ आपल्या एका कवितेत म्हणतात :

चल हो पुढे आणि पालखीला हात दे.
अजून कोणी गेलं नसेल त्या वाटेवर तिला ने.

दुर्लक्षिताचा सल बाळगून जयंत पाटील आपल्या 'एकलव्य' या कवितेत म्हणतात :

तुझं धनुष्य आणि बाण मात्र जपून ठेव
आणि अंगठ्यातलं ठिबकणारं रक्त पिऊन टाक.
उद्याच्या रक्ताळलेल्या सूर्याला अर्घ्य देण्यासाठी.

गूढता आणि विषण्णता या तरुण मनाला बिलगून बसलेल्या, दाहक पण हव्या-हव्याशा वाटणाऱ्या अनिवार्य भावना. सुनंदा करमरकर आपल्या ' अटळा 'कडे पाठ फिरविण्याच्या प्रयत्नात म्हणतात....

ओढून घेतो तेच हात सुरकुतलेले
माझ्या प्रशिक्षित कानांवर
अन् झोपून जातो काहीच न घडल्यासारखा.
स्वप्नात दिसतात माझ्या लहान डोळ्यांना
बिनकेसाच्या पांढऱ्या विधवा.
सांडू लागतात त्यांच्या डोळ्यांतून तेच अनाथ घंटानाद.

'जिप्सी'ने केलेल्या मंथनात अनेक रत्नं गवसली. रे. भ. भारद्वाजकर, प्रमाद दत्त पाठक, श्रीकांत कृष्ण निकुम्भ, सानिया, रमेश ललगुणकर.... नावं घ्यावीत तितकी थोडी.

माडगूळकर घराण्याकडून पुरवठा होणारी ताजी, सकस, सहजकविता हे 'जिप्सी'चे एक खास वैशिष्ट्य!

मग.... तुझी लागता चाहूल, मन मनात फिरले
आली क्षितिजाची सय, डोळी आभाळ बुडाले

असं उसासणारे श्रीधर माडगूळकर असोत, किंवा....

देहाच्या दिशेने....मरण हात झेपावतात
मला सहन होत नाही.
डोळे मिटून मी सती जातो.

असं आक्रोशणारे प्रकाश माडगूळकर असोत, किंवा

गार झोंबाया लागले, नभी शेकोटी पेटली।
अंग चोरून शेवरी, ऊस तुऱ्याला भिडली।

हे अनिमिष अनुभवणारे दिलीप माडगूळकर असोत, भाषेचा अस्सल बाज कुठे लपणार नाही. खुद्द ग. दि. मां.नासुद्धा या जथ्यात सामील झाल्यावाचून राहवले नाही. एखाद्या नवतरुणाच्या जिद्दीने त्यांनी आरोळी दिली...

अंगाचेच अंथरूण कर, थकवा घे उशाला
अरे! अनिकेत अनामिकाला, सावलीचा सोस पाहिजे कशाला?

कथेच्या बाबतीतही जिप्सीच्या लेखकांनी हाताळलेले विषय अतिशय ताजेतवाने आणि तंत्राची नवनवीन आव्हाने पेलणारे होते. 'विषय' या कथेत अ. वि. केदारी यांनी specific sex urge असणाऱ्या एका मनस्विनीची शोकांतिका मांडली होती, तर 'पंधरा ऑगष्टचा दिस' या कथेत द. स. काकड्यांनी केलेलं एका स्वातंत्र्यदिनाचं चित्रण मनाला अंतर्मुख करणारं होतं. यांशिवाय माधव चंद्रचूड यांची 'यात्रा', अर्जुन भोसले यांची 'कर्दनकाळी,' प्रकाश कांबळे यांची 'जाळं' या वेगवेगळी तंत्रे वापरून लिहिल्या गेलेल्या कथा वाचकांना एका वेगळ्या भावविश्वात नेऊन जाण्यास समर्थ ठरल्या.

तिशीतल्या एका प्रौढेच्या आणि किशोरावस्थेतील एका तरुणाच्या जगावेगळ्या भावविश्वावर उभारलेली माझी 'वाघूळ' ही कादंबरी त्यातल्या प्रथम पुरुषी निवेदन पद्धतीमुळे वाचकांना आगळा अनुभव देऊन गेली; तर कु. प्रतिभा ताम्हाणे यांच्या 'उघडले एक चंदनी दार' या कादंबरीची उभारणी एका स्वप्निल हळव्या मुलीच्या मनोविकारांवर केली होती.

साहित्य हा जिप्सीचा गुणधर्म असला तरी ते त्याचे सर्वस्व नव्हते. त्यामुळेच

साहित्यप्रेमाचा बुरखा पांघरून देशकाल परिस्थितीकडे डोळेझाक करण्याचा करंटेपणा जिप्सीने दाखविला नाही. समाजकंटकांवर, समाजविघातक प्रवृत्तींवर 'जिप्सी'ने कडाडून हल्ले चढवले.

मुंबईतील Dancing club च्या भयानक रॅकेटवर प्रकाश टाकणारा 'बेहोश नृत्ये, मदहोश पशू' हा लेख...किंवा 'कुठे चाललो आहोत? कुठे जाणार आहोत?' हा वेश्यागमनाच्या वृत्तीवर तुटून पडणारा लेख, 'आणि ठिणगी पडली' हा जातीय दंगलीचा परामर्ष घेणारा लेख हे सर्व जिप्सीच्या जिवंतपणाचे द्योतक होते.

मुंबईच्या भयानक निशाजीवनावर आणि गुंड साम्राज्यावर तर जिप्सीने एक लेखमाला प्रसिद्ध केली. हा नुसता सनसनाटी निर्माण करण्याचा प्रयत्न नव्हता, तर सुजाणांना सावधगिरीचा कंदील होता.

'प्रायव्हेट सेक्रेटरी की सेक्स डॉल्स?', 'मुंबई चौपाटी...झीनत अम्मान ते हाजी मस्तान', या लेखांनी सुजाण वाचकांना योग्य इशारा देण्याचे कार्य केले. याच मालिकेतील 'माफिया बॉम्बे स्टाईल!' या लेखाने तर एवढी विलक्षण खळबळ उडविली की, त्यामुळे जिप्सीच्यामागे शासकीय गृहखात्याचा ससेमिरा निदान वर्षभर तरी चालू होता. विशेष म्हणजे जिप्सी प्रतिनिधींनी प्रत्यक्ष जागी जाऊन, प्रसंगी जिवावरचे धोके पत्करून ही माहिती जमविली होती. हे लेख अनेकांच्या धन्यवादास पात्र ठरले. तथापि या काहीशा सनसनाटी भासणाऱ्या लेखांबरोबर वैचारिक खाद्य पुरविण्यातही जिप्सी मागे राहिला नाही. कर्नल सूर्यकान्त स. पंडित यांची भारतीय सरसेनापतींवरची अभ्यासपूर्ण लेखमाला किंवा वि. ग. कानिटकरांची स्वातंत्र्यपूर्व परिस्थिती विशद करणारी लेखमाला जिप्सीचे भूषण ठरली.

सुस्त, मस्त आणि अन्यायाने बरबटलेल्या संस्थांना जिप्सीने गदागदा हालवले. 'फर्ग्युसन कॉलेज संस्था की संस्थान?' किंवा 'फिल्म इन्स्टिट्यूट की मिनी फिल्म इंडस्ट्री?' हे लेख संबंधितांची झोप उडविणारे ठरले. कुणी या लिखाणाला 'साप्ताहिकी' म्हणून हिणवले; पण जिप्सीला त्याची पर्वा नव्हती; कारण समाजहिताच्या दृष्टीने हे ऑपरेशन जरूर होते.

स्फोटक राजकीय मुलाखती हे जिप्सीचे आणखी एक अभिमानास्पद वैशिष्ट्य. कोणतीही भीडभाड न ठेवता घेतलेल्या या मुलाखती वाचकाला नीरक्षीरविवेकाचा आनंद मिळवून देत.

संभाजीराव काकडे आणि मोहन धारिया यांच्या समोरासमोर छापलेल्या परस्पर-विरोधी मुलाखतींनी खूप खळबळ उडविली होती. शिवसेनाप्रमुख बाळ ठाकरे यांची ऐन उमेदीच्या काळात मी घेतलेली धीट मुलाखत तिच्यातल्या परखडपणामुळे वाचकाला भयचकित करणारी ठरली होती. 'वाघाच्या गुहेत दोन तास' हे या मुलाखतीचे शीर्षकसुद्धा प्रशंसेचा विषय बनले होते. ही मुलाखत घेण्याबद्दल आणि छापण्याबद्दल

जिप्सीला धाकदपटशा आणि धमक्यांना तोंड द्यावे लागले होते. याशिवाय हमीद दलवाई, उल्हास पवार, मनोहर जोशी यांच्या मुलाखती जिप्सीच्या राजकीय दृष्टेपणाची साक्ष देणाऱ्या होत्या.

तथापि देशकार्य आणि समाजकार्य करण्याच्या भरात अंक कंटाळी, कोरडा आणि रूक्ष न होण्याची दक्षता जिप्सीने सुरुवातीपासूनच घेतली होती. यासाठी फुलांच्या ताटव्यासारखी मन प्रसन्न करणारी सदरे ‘ जिप्सी ’ च्या अग्रभागी असत. तरुणींच्या गमतीशीर (आणि चावट) वडवडीचा मागोवा घेणारे सदर ‘ कॉर्नर... कॉर्नर’ किंवा वाऊक पुढाऱ्यांचा भंपकपणा दाखवणारे सदर ‘ ते म्हणाले !’ हे जिप्सीच्या वाचकांना मोहविणारे ठरले आहे.

‘ वंचाईट ’ या जिप्सीच्या बिनधास्त, भन्नाट आणि वात्रट प्रतिनिधीने अनुपमा, तनुजा, संजीवकुमार, आय. एस. जोहर यांच्या मुलाखती वाचकांना इराण्याच्या हॉटेलातल्या खुसखुशीत समोश्यांसारख्या वाटल्या तर त्यात नवल नव्हते. देवयानी चौबळ यांची आमच्या खास प्रतिनिधीने घेतलेली ‘ अलिबाबा आणि एक बिनधास्त देवयानी चौबळ ’ ही मुलाखत आजही अनेकांच्या स्मरणात असेल. या मुलाखतीचे साद-पडसाद नंतर अनेक दिवस उमटत राहिले होते.

खरं सांगायचं तर ‘ पत्रिके ’च्या संपादकांनी सुचविलेलं जडजंबाल शीर्षक वाचून थोडासा चक्रावलोच होतो. कारण क्लिष्ट, बोजड वाङ्मयचर्चेत जिप्सीला कधीच रस नव्हता. जिप्सीची वाटचाल झाली हसत, खेळत, सगळ्यांना बरोबर घेऊन. तिथे बौद्धिक जडतेला वाव नव्हता, तसाच आक्रस्ताळ्या संतापालाही नव्हता. म्हणून जिप्सीचे ध्येय ग. दि. मां.च्याच शब्दांत सांगायचे तर

पाय ठणकताहेत ? टेका पकड त्या ठणकण्याचा !
तुला वाट शोधून काढायची नाही.
पाडायची आहे.

★

“...सतत उद्योग करणारे, साहित्यावर निष्ठा ठेवणारे, वाचकांच्या अभिरुचीला वळण देणारे, स्वतःच्या अनुभवांशी व मतांशी सतत प्रामाणिकपणा ठेवणारे आणि साहित्याविषयाच्या प्रेमाची जोपासना करणारे साहित्यिक मला आवडतात. आपले मित्र श्री. पु. भा. भावे अशा प्रतिज्ञेने लिहिणारे आहेत. कथा, कादंबरी, नाटक, वृत्तपत्रीय लेखन अशा सर्व क्षेत्रांत श्री. भावे यांनी लक्षणीय यश संपादिले आहे. साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन गुणग्राही वाचकांनी त्यांचा सत्कार केला आहे. त्याबद्दल मी भावे यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.”

—ना. सी. फडके

अनुक्रमणिका

# मराठी देवनागरी वर्णक्रमी : एक टिपण

**अशोक रा. केळकर**

मराठीमध्ये अकरावित्ल्हे कशी करायची ह्या बाबतीत दुहेरी अराजक आहे. एक तर नियमांसंबंधी एकवाक्यता नाही—उदाहरणार्थ, कुणी अं हा औ नंतर घेतात, कुणी अ नंतर, कुणी आणखी कुठे. दुसरे म्हणजे अकारविल्हे किंवा वर्णक्रमी ह्या संबंधात काही नियम असतात ह्याचाच कुणाला पत्ता नसतो—उदाहरणार्थ, पटवर्धन, प्रकाश, पित्रे, पिंता असा ' क्रम ' लावणारे बहाद्दरही मिळतात !

देवनागरीची मराठीपुरती वर्णक्रमी काही सोप्या आणि सुसंगत पद्धतीने करता येते का हे पाहण्याचा ह्या टिपणामध्ये उद्देश आहे. पुस्तकाच्या शेवटी सूची जोडणे, मतदारांच्या किंवा इतर याद्या करणे, शब्दकोश आणि ज्ञानकोश ह्यांच्यामधल्या नोंदींचा क्रम ठरवणे अशा निरनिराळ्या कामांत ह्या वर्णक्रमीचा उपयोग आहे. जर सर्वांना मान्य अशी पद्धत ठरली तर शालेय अभ्यासक्रमात ' पुढील शब्द वर्णक्रमीनुसार लावून दाखवा ' असा प्रश्नही विद्यार्थ्यांकडून सोडवून घेता येईल.

( १ ) वर्णक्रमी ठरविण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे वर्णमाला मानावी—

अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ<br>
ए ॲ ऐ ओ ऑ औ<br>
ं ः<br>
क् ख् ग् घ् ङ् च् छ् ज् झ् ञ्<br>
ट् ठ् ड् ढ् ण् त् थ् द् ध् न्<br>
प् फ् ब् भ् म्<br>
य् र् ल् व् श् ष् स् ह् ळ्<br>
क्ष् ज्ञ्

दोन शब्दांमधली कोरी जागा ( शब्दखंड ) आणि संयोगी चिन्ह ( - ) ही वर्णमालेच्या सुरवातीची, म्हणजे अ च्या आधीची दोन चिन्हे आहेत असे मानावे. औ आणि क् ह्यांच्या मधली चिन्हे शिरोबिंदू ( डोक्यावरचे टिंब ) आणि विसर्ग अशी आहेत, अं आणि अः नाहीत हे ध्यानात ठेवावे.

वर्णक्रमी ह्या पद्धतीने रहावी. एवढा एकच नियम खरे म्हणजे पुरेसा आहे. काही

उदाहरणांनी तपशिलाचे मुद्दे स्पष्ट करता येतील.

| (२) ग्राह्य क्रम | त्याज्य क्रम |
|---|---|
| अभ्यास | अभ्यास |
| अभ्यास व परीक्षा | अभ्यासक्रम |
| अभ्यास मंडळ | अभ्यास-मंडळ |
| अभ्यासक्रम | अभ्यास व परीक्षा |
| अभ्यासू | अभ्यासू |

**युक्तिवाद** : वर त्याज्य ठरवलेल्या क्रमात शब्दखंड आणि संयोगीचिन्ह ह्यांच्याकडे दुर्लक्ष केले आहे. अशा पद्धतीत पद आणि त्याने आरंभ होणाऱ्या पदांच्या साखळ्या ह्यांमध्ये दुसरी पदे घुसण्याचा संभव असतो. 'विमा' आणि 'विमायोजना' ह्यांच्यामध्ये 'विमान' घुसेल. 'विद्युत्' आणि 'विद्युत्-मंडळ' ह्यांच्यामध्ये 'विद्युतीकरण' शिरेल. असे होणे सोयीचे नाही. पहिल्या ग्राह्य क्रमात 'अभ्यास'-मधल्या स नंतर शब्दखंड, स नंतर संयोगीचिन्ह, आणि स नंतर अ पासूनचे वर्ण अशी व्यवस्था आहे. जेव्हा कवितांच्या पहिल्या चरणांची सूची बनवण्याची वेळ येते, तेव्हा ह्या व्यवस्थेचे महत्त्व अधिक लक्षात येते.

| (३) ग्राह्य | त्याज्य |
|---|---|
| असिधाराव्रत | असिधाराव्रत |
| अळणी | ॲसिड |
| एरंड | अळणी |
| ॲसिड | एरंड |
| कोरड | कॉफी |
| कॉफी | कोरड |

**युक्तिवाद** : ॲ हे चिन्ह अे (म्हणजे ए) ची शिरोमात्रा उलटी करून तयार केलेले आहे, अ वर चंद्र टाकून केलेले नाही. त्याचप्रमाणे ऑ हे ओ ची मात्रा उलटी करून बनले आहे, आ पासून नाही. गुजरातीमध्येही कधी असे करतात : गोळ (गोल), गॉळ (गूळ). अखेर ॲ आणि ऑ ह्या अनुक्रमे ए आणि ओ च्याच अधिक विवृत (जबडा अधिक वासून उच्चारलेल्या) आवृत्त्या आहेत.

| (४) ग्राह्य | त्याज्य | त्याज्य |
|---|---|---|
| अ | अ | अ |
| अंडे | अकाल | अकाल |
| अकाल | अँत | अंडे |
| औत | अंडे | औत |
| कमळ | कमळ | कमळ |

अनुक्रमणिका

| ग्राह्य | त्याज्य | त्याज्य |
|---|---|---|
| निंब | निकाल | निकाल |
| निःपात | निःपात | निंब |
| निकाल | निंब | निःपात |
| सई | सई | सई |
| संत | संत | सतावणे |
| संप | सतावणे | समाप्त |
| सतावणे | संप | संत |
| समाप्त | समाप्त | संप |

**युक्तिवाद** : जो न्याय अं, अः ला लावायचा तो इं, इः किंवा उं, उः इत्यादी जोड्यांना लावायला पाहिजे. लहान मुलांच्या वर्णमालेत औ नंतर ं ः असे न घालता अं अः असे घातले जाते ते केवळ ं ः ची उदाहरणे देऊन समजूत पटवावी म्हणून. अं अः हे अक् अख् च्या आधी का घालायचे, तर एक सोपा सुसूत्र नियम बसतो म्हणून. संस्कृत, हिंदी कोश आणि हिंदी टेलिफोन डिरेक्टरी ह्यांतून हाच क्रम आहे. मराठीत शिरोबिंदू दुर्लक्षून वर्णक्रमी ठरवण्याची सवलत का घेतली गेली? त्या वेळी 'बिसांवा' सारख्या शब्दांमधून अनुच्चारित शिरोबिंदूंना संचार सर्वत्र असल्या-मुळे कोश पाहणाराला खात्री नसे की, आपल्याला हव्या असलेल्या पदात शिरोबिंदू आहे की नाही. त्या वेळी कोशकार वाचकाला म्हणे, तुला ते माहीत नसले तरी चालेल, अशा खुबीने मी क्रम रचला आहे. ( मधला स्तंभ पहा. ) आज अशा शिरोबिंदूंचे उच्चाटन झाल्यावर ही ( आता ) निरर्थक सवलत ठेवून इतर भारतीय भाषांपेक्षा वेगळी वर्णक्रमी ठेवण्याची गरज काय ?

ह्या संबंधात आणखी एक पर्यायी क्रम कधी सुचवण्यात येतो, तो तिसऱ्या स्तंभात दाखवलेला आहे. त्यामध्ये अं, अः; इं, इः इत्यादी जोड्यांना एकच न्याय लावला आहे हे खरे. मात्र तो न्याय म्हणजे अ नंतर अं, अः, इ नंतर इं, इः ह्या पद्धतीने व्यवस्था लावायची. निराळ्या शब्दांत सांगायचे तर ं ः हा स्वरयोगी चिन्हांचा गट नेहमीप्रमाणे स्वर आणि व्यंजने ह्यांच्यामध्ये न टाकता वर्णमालेच्या शेवटी टाकायचा. ( स्वरयोगी चिन्हे म्हणजे नेहमी स्वरानंतर त्याला जोडून येतात अशी चिन्हे. ) ही फिरवाफिरव करण्यापेक्षा ं ः परिचित जागीच ठेवणे बरे.

जेव्हा नासिक्य व्यंजने जोडाक्षराच्या सुरवातीला किंवा मध्ये येतात. ( उदाहरणार्थ वाङ्मय, शार्ङ्गधर, अन्न, संन्यास, सम्राट ) तेव्हा अर्थात अशी जोडाक्षरे इतर जोडाक्षरांप्रमाणेच गणली जातात. सर्व ं आणि ः ह्यांना एका मापाने न मोजता संत, संप यांसारखे शब्द जोडाक्षराचे समजावे ( सन्त, सम्प ) आणि संशय, संज्ञा, दुःख, निःपात यांसारखे शब्द मात्र स्वरादियुक्त समजावे असे काहीजण सुचवतात.

(उदाहरणार्थ, शेवटचे चार शब्द सतावणे, संत, समाप्त, संप असे ठेवावे असे त्यांचे म्हणणे.) वर्णक्रमीचे नियम क्लिष्ट करण्याखेरीज ह्यात काही लाभ दिसत नाही. वर्ण-क्रमी रचताना किंवा रचलेली वर्णक्रमी वाचताना लेखनाचे भान ठेवणे पुरेसे ठरावे. उच्चाराचे भान ठेवायचे, तर संव्‌शय, संव्‌ज्ञा, दुक्ख, निह्‌पात असे उच्चार ध्यानात घेऊन वर्णक्रमी ठरवणे का नको, हाही मग एक प्रश्न आहेच !

| (५) ग्राह्य | त्याज्य |
|---|---|
| क्वचित् | क्वचित् |
| जेवण | क्षमा |
| हळद | जेवण |
| क्षमा | ज्ञान |
| ज्ञान | हळद |

**युक्तिवाद** : जोडाक्षरे ही त्यांच्या घटक व्यंजनांनुसार योग्य ठिकाणी घालायची हा सोपा नियम. वर्णमाला ळ् पाशी थांबते हेही खरे. पण ज्या जोडाक्षरांच्या दर्शनी आकारावरून त्यांची घटक व्यंजने चटकन ध्यानात येत नाहीत, त्यांपैकी काही वर्णमालेच्या शेवटी शिकाऊ मुलांच्या समजुतीसाठी घालण्याची पद्धत पडली. हिंदीमध्ये क्ष, त्र, ज्ञ, तर मराठीत क्ष, ज्ञ ठेवतात. मात्र द्य (द्य), क्त (क्त), श्र (श्र) ही जोडाक्षरे ह्याच जातीची असूनसुद्धा त्यांना कुणीच स्वतंत्र गणत नाही. आता ह्या जोडाक्षरांची वर्णक्रमीत दखल घ्यावी का ? क्ष ची फोड क्ष अशी करणे, किंबहुना असेच लेखन करणे अवघड नाही. (रोमन लिपीत Dixit दिक्सीत लिहिणे समर्थनीय नाहीच!) परंतु ज्ञ च्या बाबतीत अडचण आहे. ज्ञ म्हणजे संस्कृतात ज् + ञ् , हिंदीत ग् + य् + ँ गुजरातीत ग् + न्, मराठीत द् + न् + य् अशी विविधता आहे. (त्यामुळे रोमन लिप्यंतरातही अनिश्चितता आहे. –jn, gy, gn, dny) म्हणून तडजोड करावी लागते. क्ष्, ज्ञ् परंपरेप्रमाणे ळ् नंतर ठेवावी. शास्त्रीय ग्रंथात मात्र वर्णमाला ळ् पाशीच थांबेल.

| (६) ग्राह्य | त्याज्य |
|---|---|
| कलम | कलम |
| कहर | कळस |
| कळस | कहर |

**युक्तिवाद** : काही लोक मात्र वर्णमालेच्या शेवटी ळ् हे व्यंजन ठेवायला तयार नाहीत. वैदिक संस्कृतात क्वचित ळ् दिसत असला तरी संस्कृत वर्णमालेत त्याला स्वतंत्र स्थान नाही. संस्कृतमध्ये ळ् आणि ळ्ह् हे अनुक्रमे ड् आणि ढ् चे पर्याय म्हणूनच वावरतात. मराठीत ळ् हा ल् नंतर घालावा असे सुचवण्यात आलेले आहे. (गुजरातीमध्ये पारंपरिक क्रम ह् ळ् क्ष् ज्ञ् असाच आहे. ओडिया लिपीत य् र् ळ् ल् व् असा क्रम

आहे. किंबहुना काही दशकांपूर्वी ओडिया लिपीत ळ् आणि ल् एकाच चिन्हाने दाखवीत असत.) मराठीत ळ् हा सध्याच्या रूढीनुसार ह् नंतर घालावा हे खरे. ल् नंतर ळ् घालण्यात काही खास शास्त्रीयता साधते असाही भाग नाही. उच्चारणस्थाने पाहिली तर ळ् हा ड् ला जवळचा; अंतस्थवर्ण असण्याचा गुण पाहिला तर य् र् ल् व् ह्या गटात ळ् चा समावेश होऊ शकत नाही.

**समारोप :** प्रस्तुत टिपणात सुचवलेल्या वर्णक्रमीच्या बाजूने सामान्य पातळीवर सांगता येतील अशा दोन गोष्टी म्हणजे ती एकाच सुटसुटीत नियमात बसते; ' मात्र ', ' जर-तर ', ' किंवा ' ह्यांचे जंजाळ तिच्यात नाही, आणि दुसरे म्हणजे अन्य भारतीय भाषांतील वर्णक्रमीशी तिने जास्तीत जास्त मेळ राखला आहे.

प्रा. रा. श्री. जोग ह्यांनी काही वर्षांपूर्वी ह्या साध्या सोयीच्या तरतुदीविषयी किती अराजक आहे हे सोदाहरण दाखवून काही व्यवस्थाही सुचवली होती. ( ' मराठी वर्ण-मालेतील आनुपूर्वी ', महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, जुलै-सप्टेंबर १९५७ ) अलीकडे म्हणजे ' मराठी-तत्त्वज्ञान-महाकोश ' ( १९७६ ) ह्या ग्रंथाच्या प्रास्ताविकात ह्या प्रश्नाचा नव्याने विचार केला आहे. अजून तरी मंडळी जागी होतील, आणि काही शिस्त आणि एकवाक्यता येईल अशी उमेद बाळगावी काय ?

★

## कथेची कसोटी

उत्तम कलाकृतीचे एक गमक असे की, ती सादर करीत असलेला अनुभव कसदार असायला हवा. त्याच्या आस्वादाने आपल्या चित्तवृत्ती खडबडून जाग्या व्हायला हव्यात. आपल्या शरीरात ऊर्जा असते. तिचेच रूपांतर संज्ञाशक्तीच्या रूपाने झालेले आहे. साधारणपणे ती सौम्य अवस्थेत स्वरूपात वावरते. काही विशेष अनुभव आला म्हणजे ती जागृत होते. पुष्कळदा या अनुभवाच्या अमूर्त अर्थाचा विचार करीत आपण त्या अनुभवाच्या पलीकडे जातो. पुष्कळदा त्याचे भावनात्मकतेत रूपांतर होऊन कसल्यातरी कृतीत आपण त्याचे विसर्जन करतो. पण कलात्मक अनुभवास आपण त्याच्या कळा चाखण्यासाठीच रंगतो. अनुभवात असे रंगण्यामुळेच त्याला एक जिवंत स्वरूप प्राप्त होते. आता हा अनुभव फिका असला, अगर नेहमीचा सामान्य असला, तर त्यात आपण रंगणारच नाही. तो कसदार असला तरच आपल्या चित्तवृत्ती त्यात रंगतील; आणि रंगता रंगता उत्तेजित होतील.

—उत्कृष्ट कथा असा कसदार अनुभव मांडणारी कथा असते.

—**प्रभाकर पाध्ये**

( ' सत्यकथा ' मासिक, मुंबई, जून १९७३, पृ. ११ )

११

# एका पिढीचें आत्मकथन

## गं. ना. जोगळेकर

'एका पिढीचे आत्मकथन' हे अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकी एक वेधक पुस्तक आहे. मराठी साहित्यक्षेत्रात संपादक आणि संघटक म्हणून विशेष ख्यातनाम असलेले श्री. वा. रा. ढवळे यांच्या पष्ट्यब्दीपूर्तीच्या निमित्ताने हा ग्रंथ सिद्ध करण्यात आला आहे. मात्र तो प्रकाशित व्हायला चांगला आठ वर्षांचा कालावधी लागला आहे. 'साठीचा ग्रंथ सत्तरीत प्रवेश करताना' हा प्रकार एकंदरीने दुर्मिळच. 'माझ्या बाबतीत रुगळ्याच गोष्टी उशिरा घडल्या आहेत', असे स्वतः ढवळेच आपल्या आत्मकथनात म्हणतात. त्यामुळे ग्रंथनिर्मितीमधला हा उशीर सुसंगतच ठरला आहे !

पण हे असे घडले याला काही खास कारणे आहेत. केवळ स्तुतिपर लेखांनी भरलेले असे एकसुरी गौरवग्रंथ आजवर पुष्कळ प्रसिद्ध झाले आहेत. तात्कालिक आवाहकतेमुळे असे ग्रंथ काही कालावधी गेल्यानंतर फारसे उपयोगी ठरू शकत नाहीत. त्यामुळे अलीकडे काही प्रसिद्ध व्यक्तींच्या-विशेषतः साहित्यिकांच्या- गौरवार्थ निर्माण झालेले ग्रंथ हे संदर्भग्रंथ म्हणून उपयुक्त ठरावेत असा प्रयत्न होताना दिसतो. रा. श्री. जोग गं. बा. सरदार, रा. शं. वाळिंबे, शंकरराव देव इत्यादींचे गौरवग्रंथ या संदर्भात सहज आठवतात. अनेक अभ्यासकांनी विविध विषयांची केलेली चर्चा अशा ग्रंथांतून आढळते. 'एका पिढीचे आत्मकथन' हा ग्रंथ अशा प्रकारचा सामूहिक लेखसंग्रह तर आहेच, शिवाय त्याला आत्मकथनामुळे सुसूत्रपणा प्राप्त झाला आहे.

या ग्रंथाच्या संपादकांनी (पु. शि. रेगे, वा. ल. कुळकर्णी, रा. भि. जोशी व गं. ब. ग्रामोपाध्ये) जे प्रास्ताविक निवेदन केले आहे त्यावरून असे दिसते की, सामान्यतः ढवळे यांच्या वयाचे, वाङ्मयाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत प्रथितयश असे जे साहित्यिक आहेत, त्यांनी आपल्या साहित्यिक जीवनाचा मागोवा घ्यावा; साहित्यिक म्हणून आपली भूमिका कशी सिद्ध झाली तिचा शोध घ्यावा आणि या हेतूने आत्मकथन करावे. संपादकांनी चाळीस साहित्यिकाना असे लेख लिहिण्याचे आवाहन केले, आणि भरपूर प्रतीक्षा करूनही अठ्ठावीस साहित्यिकांचेच लेख त्यांच्या हाती आले. तेवढेच या ग्रंथात संगृहीत झाले आहेत.

अनुक्रमणिका

हा ग्रंथ वाचीत असताना त्यातील काही आत्मकथनांवरून ती अपुरी आहेत याची जाणीव होते. लेखनाच्या विविध क्षेत्रांत संचार करणाऱ्या व्यक्तींनी त्या सर्वच क्षेत्रांबद्दल कथन करणे वाचकांच्या जिज्ञासापूर्तीच्या दृष्टीने इष्ट ठरते, इकडे काही-जणांचे दुर्लक्ष झाले आहे. कुसुमाग्रजांनी 'मी नाटककार कसा झालो' एवढेच येथे सांगितले आहे. आपल्या कवित्वाची त्यांनी हेतुतः उपेक्षा केली आहे, की काव्य-निर्मितीबद्दल काही सांगणे अशक्य आहे असे त्यांना वाटते ? लघुनिबंधकार म्हणून मोठी मान्यता पावलेल्या काणेकरांनी फक्त आपल्या काव्यलेखनाबद्दलच लिहिले आहे ! भाषाविषयक व व्याकरणविषयक लक्षणीय लेखन केलेल्या अरविंद मंगरूळ-करांनी फक्त संगीतविषयक लेखनाबद्दलच सांगितले आहे. लेखकांच्या आत्म-कथनाला संपादकांनी पूर्ण स्वातंत्र्य द्यावे हे योग्य असले तरी अशा काही लेखकांची अपुरी प्रतिमा त्यांच्या आत्मकथनातून निर्माण झाली आहे असे म्हटले पाहिजे.

या ग्रंथातील अपुरेपणाच्या अशा या दोनतीन गोष्टी सोडल्या तर मात्र ग्रंथाचे स्वरूप अंतर्बाह्य देखणे आहे यात शंका नाही. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद किंवा तशा प्रकारचा सन्मान ज्यांना प्राप्त झाला आहे अशा मान्यवरांची येथे भेट घडतेच; पण एरवी वाङ्मयेतिहासाच्या मुख्य दालनात कदाचित ज्यांचा गौरव झाला नसता, मात्र ज्यांची साहित्यसेवा आवर्जून विचारात घेतली पाहिजे अशा अनेक व्यक्ती येथे भेटतात ही या ग्रंथाची जमेची बाजू होय. केवळ उच्च पदस्थांनाच आवाहन करण्याचे संपादकांचे धोरण असते तर गो. के. भट, शेष ( खंडेराव सुळे ), ना. ग. जोशी, वि. ह. कुळकर्णी किंवा केशवराव मोळे यांच्या आत्मकथनाला आपण मुकलो असतो ! ( श्री. ढवळे हे स्वतः गौरवविषय आहेत म्हणून ठीक; नाहीतर केवळ लेखक म्हणून त्यांच्या कार्याचे चटकन स्मरण कितीजणांना झाले असते ? )

ज्या अठ्ठावीस साहित्यिकांनी येथे आत्मकथन केले आहे, त्यांपैकी सर्वजण अगदी प्रथमच स्वतःबद्दल काही सांगत आहेत असे नाही. प्रस्तावना किंवा काही विशेष समारंभ या निमित्ताने यांपैकी अनेकांनी आत्मनिवेदन केले आहे. पण येथे तीस-चाळीस वर्षांतील कार्याचे सिंहावलोकन केलेले असल्याने या ग्रंथाला तेवढ्या प्रमाणात वाङ्मयेतिहासाचे स्वरूपही प्राप्त झाले आहे. या आत्मकथनाची प्रत्येकाची पद्धत अर्था-तच भिन्न आहे. स्वतःच्या अनेकानेक काव्यपंक्ती उद्धृत करून आत्मतृप्त असणारे यशवन्त, काळेले यांसारखे कवी येथे आहेत, 'मला भूमिका नाहीच. मी आहे अनिल' असे मिस्कीलपणे म्हणत काव्यामध्ये सर्वाधिक महत्त्व कशाचे असते तिकडे लक्ष वेधणारे अनिल आहेत; स्वतःची सौंदर्यवादी भूमिका ठामपणे पुन्हा एकदा मांडणारे श्रीकेक्षी येथे भेटतात, तर स्वतःकडे अगदी तिऱ्हाईतपणाने पाहून मूल्यमापन करणारे रा. श्री. जोगही येथे दिसतात. ( जोगांनी स्वतःबद्दल इतके सांगितलेच कसे याचे आश्चर्य वाटते, तर श्रीकेक्षींनी स्वतःबद्दल इतकेच कसे सांगितले याचेही आश्चर्य वाटते ! )

अनुक्रमणिका

आत्मकथनामध्ये आत्मचिंतन व आत्मशोधन हे विशेष असावेत अशी अपेक्षा बाळगली तर मात्र ती काहीजणांच्या बाबतीतच पूर्ण होताना दिसेल. दा. भ. बोरकर, दुर्गा भागवत, इंदिरा संत यांचे आत्मकथन वाचताना हा अनुभव येतो. इतर बहुतेकांनी काय घडले आणि त्यात मी कसा होतो हे सांगण्यावरच भर दिला आहे. स्वतःच्या लेखनाला योग्य वेळी आणि योग्य प्रमाणात दाद मिळाली नाही अशी टोचणीही काहीजण व्यक्त करताना दिसतात. वि. ह. कुळकर्णी किंवा गो. के. भट यांचे आत्मकथन या दृष्टीने लक्षणीय झाले आहे. संपादक म्हणूनच काम करीत राहिल्याने स्वतःच्या लेखनाकडे दुर्लक्ष झाले अशी हळहळ वा. रा. ढवळे यांनी व्यक्त केली आहे. उदंड साहित्यिक कर्तृत्व असूनही स्वत कडे कमीपणा घेणारे खांडेकर किंवा वामन चोरघडे यांच्या आत्मकथनातील विनयशीलता जशी उठून दिसते त्याप्रमाणे वि. भि. कोलते, वा. ल. कुळकर्णी किंवा प्रभाकर पाध्ये यांच्या कथनामधून. केलेल्या कार्याचा त्यांना वाटणारा रास्त अभिमान जाणवत राहतो. वा. रा. कान्त किंवा पु. शि. रेगे आत्मकथनापेक्षा वाङ्मयीन प्रश्नांची चर्चा करण्यावर भर देताना दिसतात. रा. भि. जोशी, भ. श्री. पंडित आणि गं. व. ग्रामोपाध्ये यांचे आत्मकथन नेटके व प्रांजळ वाटते, तर माडखोलकरांच्या आत्मकथनाला नकळत कैफियतीचे स्वरूप प्राप्त झाले आहे. अशी या ग्रंथातली आत्मकथने कमीअधिक प्रमाणात प्रभाव पाडणारी झाली आहेत; पण ग्रंथातील सर्वात उत्तम जमलेला लेख मात्र आहे परदर्शनाचा ! 'माझे— नव्हे, आमचे मित्र ढवळे' हा वा. ल. कुळकर्णी यांचा लेख ढवळ्यांच्या गुणविशेषांचे हृद्य दर्शन घडवतोच, पण १९३० नंतरच्या वाङ्मयीन चळवळींचा परामर्शही त्यातून वेधकपणे घेतला गेल्याचे जाणवते.

'एका पिढीचे आत्मकथन' या ग्रंथाने नेमके कोणते कार्य साधले आहे? संदर्भग्रंथ म्हणून तो उपयुक्त ठरेलच. १९३० नंतरच्या वाङ्मयीन प्रवाहांची कल्पनाही त्यामुळे येईल. वाङ्मयाबद्दल उदंड उत्साह, जागरूक परिश्रमशीलता आणि त्याहीपेक्षा अव्यभिचारी निष्ठा यांचे जे दर्शन या आत्मकथनांतून घडते, तेच खरे त्याचे यश होय. एका पिढीने नंतरच्या पिढीला या गुणांचा वारसा देऊ केला आहे !

**एका पिढीचे आत्मकथन**

(वा. रा. ढवळे गौरव-ग्रंथ)

संपादक : पु. शि. रेगे, वा. ल. कुळकर्णी, रा. भि. जोशी, गं. व. ग्रामोपाध्ये.
मुंबई मराठी साहित्य संघ-प्रकाशन, मुंबई- ४००००४, प्रथमावृत्ती, १९७५;
पृष्ठे डेमी २० + ३४१, मूल्य पंचवीस रुपये.

■

# मराठीच्या आदि-पर्वावर नवा प्रकाश

शांताराम भालचंद्र देव

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांनी मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रामध्ये आणि सांस्कृतिक इतिहासाच्या क्षेत्रामध्ये आपल्या संशोधनाचे एक खास वैशिष्ट्यपूर्ण असे व्यक्तिमत्त्व चिरस्थायी केलेले आहे. या दोन्ही क्षेत्रांत भावुकतेला फार मोठा वाव असला तरी डॉ. ढेरे या भावुकतेपासून अलिप्त राहिलेले आहेत आणि त्यांचे लिखाण तर्कसंगत, विश्लेषणात्मक आणि बुद्धिनिष्ठ राहिलेले आहे. त्यात लेख-विषयाबद्दल जिव्हाळा असला तरी भाबडी भावुकता नाही.

सांस्कृतिक संशोधनाच्या क्षेत्रात ढेरे हे नवागत नाहीत आणि त्यांच्या संशोधनाचा आवाका किती विलक्षण आहे याचे प्रत्यंतर त्यांच्या प्रत्येक ग्रंथात प्रत्ययास येते. त्यांनी आतापर्यंत अनेक पुस्तके आणि लेख लिहिले असले तरी प्रत्येकात नवीन विचार, नवी दिशा व नवीन आव्हाने मांडलेली आढळून येतात. आपल्या संशोधन-क्षेत्राची चौकट त्यांनी या आधीच्या लिखाणावरून पक्की केलेली असली तरी त्यांच्या कुठल्याही लिखाणात पुनरुक्ती नाही अथवा तर्कदुष्ट मांडणी नाही. जरासाही तोल ढळल्याचे आढळून येत नाही.

लेखकाचे व्यक्तिमत्त्व आणि त्याच्या लिखाणाची मांडणी यांचा विलक्षण समन्वय ढेऱ्यांच्या लिखाणात दिसून येतो. बोलण्यातील मृदुता, वागण्यातील शालीनता, त्याचप्रमाणे तर्कसिद्ध मतांचा निर्धाराने पाठपुरावा ही सर्व व्यक्तिगत वैशिष्ट्ये त्यांच्या लिखाणातही दिसून येतात. आपल्या मताची मांडणी ते सुसंस्कृत, प्रौढ व शालीन भाषेत करतात.

यादव आणि यादवपूर्व कालात महाराष्ट्रामध्ये विविध धार्मिक संप्रदायांनी विविध अंगांनी जो भक्तीचा मळा फुलवला, त्याच्या पार्श्वभूमीचे एक अत्यंत परिपूर्ण असे विश्लेषण, बहुतांशी प्राचीन मराठी वाङ्मयाच्या आधाराने ढेरे यांनी या ग्रंथात केलेले आहे. सर्व विश्लेषणाचे सार एका वाक्यात श्री. ढेरे यांनी सांगितले आहे. ते वाक्य म्हणजे "मराठी वाङ्मयाचे आदिपर्व चक्रपाणीच्या उपासनेने भारलेले आहे." चांगदेव राऊळ, चक्रधर आणि चांगा वटेश्वर या तीन धर्मधुरिणांची गुरुपरंपरा कोणती, त्यांच्यावर इतरांचे प्रभाव कसे व कितपत पडले या निरनिराळ्या प्रभावांच्या दडपणा-

खाली यांचे मार्ग वस्तुतः कसे वेगळे वाटू लागले आणि त्यांचा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीवर काय परिणाम झाला या सर्व विश्लेषणाचे एक मनोहारी इंद्रधनुष्य — इंद्रजाल नव्हे— आपणांसमोर उभे करण्यात आलेले आहे. इंद्रधनुष्याचे रंग वेगळे वाटत असले तरी त्यांची अंतःस्थ सरमिसळ जशी तरलपणे झालेली असते तमेच काहीसे यादवकालाच्या सांस्कृतिक इतिहासात झालेले आहे. पाशुपत, नाथ, वीरशैव, महानुभाव या विविध संप्रदायांची काही यावर्तीत कशी येमालूम सरमिसळ झाली हे डॉ. ढेरे यांनी या ग्रंथामध्ये आंतरिक जिव्हाळयाने सांगितले आहे आणि असे सांगताना ढेऱ्यांचा पिंड मूलतः सांस्कृतिक इतिहासकाराचा आहे हे जागोजागी प्रत्ययास येते. 'चक्रपाणी'मध्ये श्री. ढेरे यांना विसोबा खेचरविरचित 'षट्स्थल' नावाचा जो ग्रंथ उपलब्ध झाला होता, त्यावर प्रामुख्याने लेखांचा मनोरा उभा केला आहे. मात्र ढेऱ्यांचे हे संशोधन केवळ पुस्तकी राहिले नाही. आपल्या लिखाणाची मांड पक्की व्हावी म्हणून त्यांनी अनेक प्राचीन स्थळांची शोधयात्रा केली. संस्कृत, हिंदी व इंग्रजी साहित्यांतून आपल्या विवेचनाला उपोद्बलक ठरेल अशा साधनांचा धांडोळा घेतला. प्रा. कुरुंदकरांनी म्हटल्याप्रमाणे ढेरे आपल्या वर्गात आपणच बसणारे असे संशोधक आहेत.

विसोबा खेचर यांनी आपल्या 'षट्स्थल' नामक ग्रंथात जो विषय मांडला आहे तो शैवागमाशी निगडित आहे आणि वीरशैव संप्रदायाशी त्याची जवळीक आहे. विसोबा खेचर हे नाथपंथी गुरुपरंपरेशी आपले आध्यात्मिक नाते दाखवितात. असे असताना त्यांनी वीरशैव विचाराचा वारसा आपल्या लिखाणात स्पष्ट करावा, हे कोडे डॉ. ढेरे यांना प्रथम जाणवले आणि म्हणूनच नाथ, महानुभाव आणि वीरशैव या यादव-कालातील प्रमुख संप्रदायांची एकमेकांशी वैचारिक सरमिसळ कशा तऱ्हेने झाली व ही सरमिसळ होण्यामागे कोणत्या आध्यात्मिक परंपरा व वैचारिक साधर्म्य उपयोगी पडले याचा मागोवा या ग्रंथात मोठ्या आस्थापूर्वक घेतला गेला आहे. ग्रंथातील विविध प्रकरणे याच एका सूत्राने एकत्र ओवलेली आहेत.

विसोबा खेचरांवरील लेखाच्या मांडणीत ढेरे यांनी विसोबांचे चरित्र, त्यांचे आडनाव आणि त्यांची गुरुपरंपरा यांचे मोठ्या तपशिलाने विश्लेषण केले आहे. या विश्लेषणात भक्तविजय, ज्ञानेश्वरी, शिल्पशास्त्र आणि खुद्द षट्स्थल या सर्व ग्रंथांतील माहिती मोठ्या चोखंदळपणे मांडलेली आहे. विसोबा यांची परंपरा जरी नाथसंप्रदायाची असली तरी षट्स्थलामध्ये वीरशैवांचा तत्त्वविचार केलेला आहे; व त्यांच्या गुरुपरंपरेला उल्लेखिलेली मुक्ताई ही गोरक्षनाथांची शिष्यवरा होती, हे ग्रंथकाराने विशद केले आहे. अशाच तऱ्हेचे विवेचन अल्लम प्रभू आणि गोरक्षनाथ यांच्या आध्यात्मिक विचारांच्या विश्ले-षणात दिसून येते.

आपल्या सर्व विवेचनात डॉ. ढेरे आपल्या मूळ सूत्रापासून कधीही ढळत नाहीत

अनुक्रमणिका

या विवेचनात ढेऱ्यांनी हे दाखवून दिले आहे की, नाथसंप्रदायाची राऊळ शाखा ही लाकुल पाशुपत संप्रदायाची असून त्या अनुषंगाने असे मत मांडले आहे की, नाथ आणि वीरशैव यांची मूलप्रेरणा पाशुपत संप्रदायात पाहावयास मिळते. अल्लम प्रभू व गोरक्षनाथ हे दोघेही मूलतः मत्स्येंद्रनाथांचे शिष्य असल्यामुळे या दोघांचा संपर्क येणे साहजिक होते. आणि या दोघांचा संपर्क श्रीपर्वतावरील कदलीवनात आला. यातून जी देवाण-घेवाण झाली तिचे अत्यंत सुस्पष्ट विवेचन संस्कृत आणि हिंदी ग्रंथ, त्याचप्रमाणे शिलालेखीय पुराव्यावरून ढेरे यांनी केले आहे. गोरक्षनाथ आणि ज्ञानेश्वर यांची अध्यात्मपरंपरा एकच असल्याने आणि गोरक्षनाथ आणि अल्लमप्रभू यांचा संपर्क असल्याने ज्ञानेश्वर आणि मुक्ताबाई यांच्या लिखाणांत वीरशैवांची आध्यात्मिक परिभाषा अधूनमधून योजली जाते. हे कसे सुसंगत आहे ते अनेक अभंग व ओव्या उद्धृत करून स्पष्ट करण्यात आलेले आहे. नाथ–वीरशैव आणि भागवत यांची आध्यत्मिक सूत्रे एकमेकांत किती बेमालूमपणे ओवली गेली आहेत हे ढेरे यांनी अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने दाखवून दिले आहे. यात त्यांच्या विपुल वाचनाचा, वेधक निवडीचा आणि तर्कसंगत विवेचनाचा आवाका दिसून येतो.

मुक्ताईचे गूढही याच पार्श्वभूमीवर उलगडण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. विसोबा खेचर आपली गुरुपरंपरा आदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, मुक्ताई, चांगा वटेश्वर या अनुक्रमात बसवितात. सर्वसाधारणपणे ही मुक्ताई ज्ञानेश्वरभगिनी म्हणून ओळखली जाते. 'शिवयोगिनी मुक्ताई' या लेखात ही मुक्ताई म्हणजे, चांगदेवांना बोध केल्यानंतर गोरक्षनाथांची शिष्या असलेली मुक्ताई दिवंगत झाली असावी आणि त्याच वेळी महाराष्ट्रभर गाजत असलेल्या ज्ञानेश्वरमंडळातील बालयोगिनी मुक्ताबाईंना त्यांनी गुरू म्हणून स्वीकारली असावी. पुढे 'नावही तेच, योगाधिकारही तोच', या शब्दांत परिचित केली गेली आहे. चक्रधर आणि मुक्ताई यांची आंध्रमधील श्रीपर्वतावर झालेली भेट, डाकराम म्हणजे आंध्रमधील द्राक्षाराम आणि श्रीपर्वत साधनाकेंद्र असल्याने नाथसांप्रदायिकांचा, चक्रधरांचा आणि वीरशैवीयांचा आलेला निकटचा संबंध आणि मुक्ताईचा 'राजा विक्रमादित्याची भावजय' म्हणून आलेला वाङ्मयीन संदर्भ या सर्वांचे विवेचन सांस्कृतिक इतिहासकारास अंतर्मुख करायला लावणारे आहे.

सबंध ग्रंथामध्ये विसोबा खेचर प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे वावरतात. त्यांचे गुरू चांगा वटेश्वर यांचे चरित्र आणि चारित्र्य एका लेखात समाविष्ट केलेले आहे. या विवेचनामध्ये चांगा वटेश्वरांचे काही अज्ञात पैलू ढेऱ्यांनी उजेडात आणलेले आहेत. वाटीचा ईश्वर म्हणजे वटेश्वर ही दृढमूल झालेली हास्यास्पद व्युत्पत्ती किती फोल आहे हे खेचरांच्या षट्स्थल ग्रंथातील उल्लेखाच्या आधारे स्पष्ट करण्यात आलेले आहे. चांगदेव आणि चक्रपाणी या व्यक्ती दोन नसून एकच होत्या. चांगा वटेश्वर आणि

चांगा केशवदास यांच्यातील फरक आणि खेचर यांचा वटेश्वर संप्रदाय याबद्दलची बरीच नवीन माहिती या लेखात उपलब्ध होते.

महाराष्ट्राच्या नगर जिल्ह्यात असलेल्या हरिश्चंद्रगडाचा सांस्कृतिक आणि धार्मिक इतिहासात अनन्यसाधारण वाटा आहे, हे हरिश्चंद्रगडावरील विस्तृत लेखात साधार मांडलेले आहे. या गडाचे गूढरम्य वातावरण, तेथील गुहा व तेथील शिलालेख यांचा एकत्रित अभ्यास करून हरिश्चंद्रगड हे प्रख्यात शिवपीठ आणि शक्तिपीठ होते असा निष्कर्ष या लेखात मांडण्यात आलेला आहे. या गडावर असलेल्या वटेश्वरसंबंधित लेखाचे वाचन दांडेकर आणि कोलते यांनी केलेले असले तरी ढेरे यांनी त्यात महत्त्व-पूर्ण दुरुस्त्या सुचविल्या आहेत. या लेखात ढेरे यांनी अनेक प्रकारच्या पुराव्यांची विस्तृत मांडणी केली आहे. या गडाच्या परिसरात सापडलेल्या पुरातत्त्वीय पुराव्या-नुसार हा विभाग नाथपंथ, शैवपंथ आणि वैष्णवपंथ यांची संगमभूमी होती असे स्पष्ट होते. आणि या सांस्कृतिक संगमाचे पडसाद हरिश्चंद्रगडाशिवाय पूर आणि सासवड येथेही जाणवतात.

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात चक्रधरांचे स्थान अद्वितीय आहे. परंतु त्यांच्या कार्याचा व महानुभाव पंथाचा अभ्यास परंपरागत दृष्टिकोनामुळे वा अज्ञानाने झालेला नव्हता असे म्हणावे लागेल. डॉ. ढेऱ्यांचा चक्रधरावरील लेख सर्वोत्कृष्ट उतरलेला आहे. त्या लेखाची विवेचनात्मक पातळी वरच्या दर्जाची आहे आणि यामुळेच चक्रधरांच्या वैचारिक घडणीत बौद्ध तांत्रिक, शैव आणि शक्ति तांत्रिक, वीरशैव आणि जैन या विविध संप्रदायांचे ठसे कसे उमटले हे कळून येते. चक्रधरांना श्रीपर्वतावर आलेला सिद्ध संपर्क त्यांच्या लीळांमध्ये दृग्गोचर होतो. केवळ आध्यात्मिक अभिव्यक्तीपलीकडे जाऊन या लेखात रसविद्या, तिची केंद्रे, तिचा महानुभाव वाङ्मयात आलेला उल्लेख, यांचा ऊहापोह आढळून येतो. तत्कालीन आंध्र-महाराष्ट्रामध्ये कितीविविध आचार-विचारांचे संप्रदाय अस्तित्वात होते याची जाणीव या लेखामधून होते.

चक्रधरस्वामींचे पूर्वसूरी चांगदेव राऊळ यांची चरित्ररेखा, एतद्विषयक लेखात स्पष्ट करण्यात आलेली आहे. यात त्यांच्या नवावताराची कथा लकुलिशांच्या अशाच कथेशी साम्य दाखवते. चांगदेव राऊळाचे, त्यांच्याशी निगडित असलेल्या सूप आणि खराटा या वस्तूंवरून मातंगीपट्ट संप्रदायाशी नाते जोडून डॉ. ढेरे आपल्याला एक सुखद धक्का देतात. तीच गोष्ट राऊळ आणि लाकुल यांच्या ऐक्याची. यावरून असे दिसून येते की, चांगदेव हे नाथसंप्रदायाच्या लाकुल पाशुपत पंथाशी निगडित होते. महाराष्ट्रातील ' भराडी ' महानुभाव संप्रदायाचा मुंडीदर्शन असा उल्लेख आणि या मुंडीमार्गाचा न्याय, वैशेषिक सिद्धान्ताशी संबंध याचे अत्यंत सुस्पष्ट विवेचन या लेखात करण्यात आलेले आहे.

गुंडम राऊळ आणि उधळीनाथ यांच्यावरील लेखात हे सूत्र कायम ठेवण्यात आले असले तरी चर्चेच्या संदर्भात अनेक नवीन मुद्दे उजेडात आलेले आहेत. तुळपुळे, नेने आणि कोल्हते या पूर्वसूरींच्या मतांचा आदर राखूनही डॉ. ढेरे तर्कसंगत निर्धाराने आपली मतभिन्नता दाखवितात. कांती म्हणजे नागपूरजवळील काटोल नव्हे तर दक्षिणेतील कांची हे पाशुपतांचे व कापालिकांचे केंद्र होते–हे मत मांडताना ढेरे यांचे विवेचन अत्यंत सुस्पष्ट वाटते. या कांचीतच चक्रधरांची आणि उधळीनाथांची भेट होऊन आध्यात्मिक सामंजस्य निर्माण झाले असले, तरी कालांतराने ' अवधूतमान्य कन्नड देश व तेलंग देश ' येथे जाण्यास चक्रधरांनी आपल्या शिष्यांस मज्जाव केला. चक्रधर आणि हरिनाथ या दोन व्यक्ती नसून ती एकच व्यक्ती होती हाही एक नवा शोध ढेऱ्यांनी मांडला आहे. परंतु असे करताना या मांडणीला बाधक मुद्देही त्यांनी अत्यंत प्रामाणिकपणे उल्लेखिलेले आहेत.

मुकुंदराजांच्या विवेकसिंधूतील हरिनाथांच्या चरित्राचा तपशील ' हरिनाथ आणि चांगदेव राऊळ ' या लेखात घेण्यात आला आहे. या संदर्भात हरिनाथांनी म्हणजे चक्रधरांनी पाशुपत व्रताचा अंगीकार कसा केला होता हे दाखवून दिले आहे.मुकुंदराजांनी हरिनाथांचे जे चरित्र लिहिले आहे ते चक्रधरांचे नसून चांगदेव राऊळांचे असले तरी हे दोघे आत्मतः एकच होते, ही महानुभावांची श्रद्धा ढेरे आपल्या लक्षात आणून देतात.

चक्रधरावरील लेखाप्रमाणेच ' त्र्यंबक मठिका ' हा लेखही विवेचनात्मक दृष्टया उत्कृष्ट उतरलेला आहे. या संदर्भात त्र्यंबकेश्वर क्षेत्राच्या परिसराचा आणि तेथील स्थलमानाचा विस्तृत अभ्यास आपल्यापुढे ठेवला गेला. या स्थलाचा नाथसंप्रदायाशी असलेला संबंध, मत्तमयूर शाखेतील शैव परंपरेतील तेरंबी मठिकेचे त्र्यंबक या स्थानाशी असलेले साधर्म्य, आमर्दक म्हणजे औंढे, कुंकणांबा म्हणजेच रेणुका, ब्रह्मगिरीचे कौलगिरी आणि कौलागड ही सूचक पर्याय नामे, आणि काश्मिरी शैव, चक्रधर आणि ज्ञानदेव यांचा परस्पर-संपर्क या सर्व विवेचनात महाराष्ट्रातील या त्र्यंबकेश्वर स्थलाचे आणि त्याने महाराष्ट्रीय संतांच्या जीवनात केलेल्या कामगिरीचे विवेचन या लेखात आढळून येते.

चक्रपाणीच्या निमित्ताने डॉ. ढेरे यांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व्यक्तिमत्त्वातील अज्ञात घटकांचे सम्यक दर्शन घडविलेले आहे. नाथ, वीरशैव, महानुभाव आणि वारकरी या संप्रदायांचा उद्गम लाकुलपाशुपत संप्रदायातून कसा झाला याचे इतके सुस्पष्ट विवेचन आजपर्यंत झालेले नव्हते. एवढा प्रपंच मांडूनदेखील यातील त्रुटींचे भान डॉ. ढेरे यांना आहे, ही विलक्षण बाब आहे. आपल्या संशोधनातील त्रुटींची जाण असणारा संशोधकच त्यांची उकल करण्यास समर्थ असतो. डॉ. ढेरे यांचे आतापर्यंतचे लिखाण पाहता तेच या त्रुटींचे निराकरण करू शकतील असा निःशंक भरवसा व्यक्त

अनुक्रमणिका

करणे अनुचित ठरणार नाही.

सांस्कृतिक इतिहासासारखा अनेक जणांना नीरस वाटणारा विषय मांडताना ढेऱ्यांची भाषा केवळ तर्ककर्कश आणि रुक्ष वाटत नाही, या त्यांच्या वाङ्मयीन गुणांचा आवर्जून उल्लेख करणे आवश्यक आहे. विवेचनाच्या ओघात ढेरे सहजतेने सुंदर शब्दसंभार लिहून जातात. 'भक्तिभागीरथीतील भगवे करुणा कल्लोळ,' 'काळाने स्वीकारलेले मौन,' 'अपार्थिव अनुभवाची झळाळी' 'पाझरत राहिलेली जाणीव' इत्यादी वाक्प्रयोग ढेऱ्यांच्या भाषेचे लालित्य अभावितपणे पटवून देतात. पांगारकर आणि ढेरे यांच्या लिखाणांतील भेद दाखवावयाचा झाल्यास असे म्हणता येईल की, पांगारकरांची बैठक नितान्त भक्तीवर आधारलेली होती, तर ढेरे बुद्धिनिष्ठ जिव्हाळ्याचे पाईक आहेत.

जाता-जाता एक विचार उद्भवतो की, स्थलमाहात्म्यांना, समकालीनांच्या लिखाणाला आणि ज्याचे विवेचन करावयाचे त्यानंतरच्या काळातील लिखाणाला प्रमाण म्हणून किती व कसे तोलावयाचे? अर्थात यासंबंधीची आपली बाजू ढेरे यांनी स्वतःहूनच मांडली आहे. (पृष्ठ ३१३) संशोधनातील प्रामाणिकतेला यापेक्षा दुसरा चांगला पर्याय सुचवता येणे कठीण आहे असे वाटते.

'चक्रपाणी'

डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे : विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७७,
पृष्ठे डेमी ३३५, मूल्य चाळीस रुपये.

■

## परिषदेचे नवे आजीव सभासद (स्थानिक)

(२१ मे ते ३० सप्टेंबर १९७७)

नामदार ना. ग. गोरे, डॉ. ग. न. साठे, प्रा. भय्यासाहेब ओंकार, श्री. व. मा. तुरले, श्री. अ. तु. दंडवते, श्री. वसंतराव काणे, श्री. के. वा. जोशी, श्री. गो. रा. जोशी, श्री. अ. ल. चितळे, श्री. दा. ना. गांडेकर, श्री. चंद्रशेखर य. हिर्लेकर, श्री. के. जी. परोपकारी, श्री. दि. ग. सालेडकर, श्री. पंढरीनाथ रेगे, श्री. श. वि. जोगळेकर, श्री. भा. नी. बापट, श्री. दि. वा. जोशी.

सौ. सुशील पांडे, प्रा. सौ. ललिता कुंभोजकर, प्रा. सौ. उषा शिराळकर, प्रा. सौ. रेवा कुलकर्णी, सौ. लता बापट, सौ. मधुमालती मोडक.

१३

# भारतीय तत्त्वचिंतनाचा साम्यवादी अन्वयार्थ

## जगन्नाथ वासुदेव जोशी

'भारतीय तत्त्वज्ञानः वैचारिक आणि सामाजिक संघर्ष' हे कॉमरेड श्रीनिवास ग. सरदेसाई यांचे पुस्तक यंदाच प्रसिद्ध झाले आहे. आपल्याकडील अनेक 'बुद्धिवादी' लेखक भारतीय पूर्वसूरींच्या भूमिकांची पुनरुक्ती करून तरी लिहितात, किंवा युरो-अमेरिकन विचारवंतांचा मागोवा घेत आपल्या लेखनाचा प्रपंच मांडतात. श्रीनिवास सरदेसाई यांची भूमिका मात्र स्वतंत्र आहे. वेगळी आहे. त्यांनी आपल्या प्रस्तुत पुस्तकात भारतीय भौतिकवादांचा उदय, स्वरूप, प्रभाव व महत्त्व विशद केले आहे. भारतातील चैतन्यवादी मीमांसक आणि वेदान्तनिष्ठ तत्त्वचिंतक यांच्यावर सरदेसाईंनी टीकेची धार धरली आहे, आणि मार्क्स-एंगल्स यांना 'वाट पुसत' भारतातील सामाजिक-आर्थिक स्थित्यंतराचे समालोचन केले आहे.

फ्रॉइड, मार्क्स आणि डार्विन या विचारवंतांनी जागतिक वैचारिक इतिहासालाच वेगळे वळण व परिमाण दिले आहे. त्यांचे पडसाद तत्त्वज्ञान, धर्म, नीती, कला, साहित्य आणि सामाजिक विचार इत्यादींवर झाले आहेत. पण याचा अर्थ, त्यांची प्रमेये समोर ठेवून आपण आपल्या राष्ट्रीय इतिहासाची पाने वाचावीत असे नाही. अर्थात एखाद्याचे श्रद्धास्थान मार्क्स असेल, तर सर्व जीवनश्रद्धांचा अन्वयार्थ तो त्या भूमिकेतून लावणार हे उघड आहे. पण हा अन्वयार्थही त्या विचारवंताची व्यक्तिगत भूमिका असू शकते. तिला सार्वत्रिक सत्य म्हणून मान्यता लाभेल, लाभली पाहिजे असा वैचारिक आग्रह अनाग्रही बुद्धिवादी मीमांसेच्या दृष्टीने योग्य ठरेल असे नाही.

श्री. सरदेसाई यांनी अवघ्या एकशे तेरा पृष्ठांच्या मर्यादेत 'तत्त्वज्ञान' संदर्भातील (१) अंतिम सत्तेचे स्वरूप, (२) विश्वाचे स्वरूप, (३) ज्ञानाची निर्मिती व प्रामाण्य (४) ईश्वराचे अस्तित्व आणि कार्य, (५) सामाजिक व्यवस्थेमागील तात्त्विक संकल्पना, (६) जीवनाची ध्येये व साधने, (७) जड-चेतन संबंध आणि (८) सामाजिक परिवर्तनाची नवी दिशा अशा व्यापक व गुंतागुंतीच्या समस्यांची उकल, आणि तीसुद्धा भारतीय तत्त्वचिंतन आणि मार्क्सवादी तत्त्वचिंतन यांच्या आनुषंगिक तुलनेसह करण्याचा प्रयत्न केला आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचे समाजशास्त्रीय समालोचन

अनुक्रमणिका

हा वस्तुतः अनेक खंडात्मक ग्रंथाचा विषय आहे. श्री. सरदेसाई यांची पुस्तिका त्या दृष्टीने निश्चितच अभिनंदनीय उपक्रम आहे. पण इतका व्यापक विषय, इतक्या आटोपशीरपणे मांडण्याचा यत्न केल्याने विवेचनाचे स्वरूप धावते, त्रोटक, रूपरेखेच्या स्वरूपाचे झाले आहे. श्री. सरदेसाई यांचा वैचारिक अधिकार लक्षात घेता त्यांनी विस्तृत व सखोल स्वरूपात विवेचन करणारा ग्रंथ भारतीयांसमोर ठेवावा असे वाटते. त्यामुळे भारतीय तत्त्वज्ञान व इतिहास यांच्या मूल्यमापनाचे नवे परिमाण समर्थपणे दाखवणे शक्य होईल.

श्री. सरदेसाई यांची काही मते सर्वमान्य व्हावयास हरकत नाही. त्यांपैकी काही अशी : ( १ ) वेदान्त म्हणजेच भारतीय तत्त्वज्ञान हा समज योग्य नव्हे. चैतन्यवाद आणि जडवाद हे दोनही विचारप्रवाह भारतीय तत्त्वचिंतनात प्रभावी आहेत. (पृ. १४) ( २ ) भारतीय तत्त्वज्ञान तेवढे चैतन्यवादी आणि पाश्चिमात्य तत्त्वज्ञान तेवढे जडवादी ही विभागणी योग्य नाही ( पृ. १७ ). ( ३ ) वैदिक संस्कृतीमधील गणसमाजव्यवस्थेत श्रमप्रतिष्ठा, समता, व्यक्तिहित आणि सामाजिक कल्याण यांचा समतोल, गणसत्तेचे नियामकत्व आणि ' ऋत ' संकल्पनेत असणारी भौतिक व नैतिक नियमबद्धता इत्यादी गोष्टी प्रभावी होत्या; त्यामुळे हे जीवन पुरुषार्थसंपन्न, युयुत्सू आणि अभ्युदयकारक होते. ( पृ. २३-३० ). ( ४ ) पात्रता व सामाजिक कार्य यांवर आधारित असलेल्या लवचिक समाजव्यवस्थेऐवजी, विशुद्ध वर्णव्यवस्थेऐवजी जन्माधिष्ठित चातुर्वर्ण्य कल्पनेमुळे शेकडो जातींचा उदय, आणि बौद्धिक श्रम व शारीरिक श्रम यांच्या फारकतीमुळे निर्माण झालेली उच्चनीचता यांमुळे भारतीय समाजाची प्रगती कुंठित झाली; आणि (५) तात्त्विक पांडित्य, ऐंद्रिय ज्ञानावर आधारित निसर्गाच्या प्रयोगशील अभ्यासाकडे दुर्लक्ष यांमुळे भारतात विज्ञान, तंत्रज्ञान, शोधकबुद्धीचा विकास व शास्त्रीय प्रगती भरीव स्वरूपात झाली नाही. ( पृ. ३९-४२, ८१-८४, ९७-१०० ) श्री. सरदेसाई यांच्या काही समाजशास्त्रीय मतांचा अधिक व्यापक व सखोल स्वरूपात अभ्यास व्हायला हवा. केवळ त्यांची मते साम्यवादी आहेत म्हणून ती डावलण्याच्या सनातनी वृत्तीऐवजी, भारतीय समाजातील दृढमूल झालेल्या दोषांचे निर्मूलन होण्यासाठी असे पुनरवलोकन ( Second Look ) उपकारक ठरेल. अशी काही मते पुढीलप्रमाणे : ( १ ) शोषकवर्गाच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय वर्चस्वाचे वेदान्त हे वैचारिक ( ideological ) हत्यार होते. ( पृ. ४९ ), ( २ ) शब्दप्रामाण्य, गूढवाद, आणि धनिक व सत्ताधारी वर्गांचा आधार हे चैतन्यवाद्यांचे पाठबळ होते. (पृ. ५७).

श्री. सरदेसाई यांची काही मते विवाद्य ठरणारी आहेत. उदा.–कष्टकऱ्यांची शोषणमुक्तीची आकांक्षा ही भौतिकवादी तत्त्वज्ञानाची प्रेरक शक्ती आहे. ( पृ. १०१) मार्क्सचे तत्त्वज्ञान कष्टकऱ्यांच्या शोषणमुक्तीच्या प्रेरणेतून निर्माण झाले, हे खरे आहे. पण भारतातील भौतिकवादामागे तशी सुस्पष्ट प्रेरणा होती, हे स्पष्ट होण्याकरता त्या त्या

वेळच्या सामाजिक आंदोलनांचे इतिहास, त्यामागच्या तात्त्विक प्रेरणा यांचा साक्षेपी अभ्यास व्हायला हवा आणि तो मांडायला हवा. विचाराच्या क्षेत्रात अद्वैताचा स्वीकार आणि सामाजिक व्यवहारात अस्पृश्यतेचे समर्थन हा दुर्दैवी अंतर्विरोध दूर व्हायलाच हवा. संतांच्या सामाजिक करुणेत अध्यात्मवाद दिसतो, पण समर्थ रामदासांसारखे अपवाद सोडले तर सामाजिक कार्यक्रम आणि सामर्थ्यपूर्ण संघटन यांस आवाहन आढळत नाही. शेकडो वर्षे दैन्य, दारिद्र्य, शोषण, विषमता यांनी पिचलेल्या भारतीय समाजाला जागृतीचा संदेश देणारे तत्त्ववेत्ते निर्माण झाले, पण आमूलाग्र सामाजिक क्रान्तीची प्रेरणा देणारा मार्क्स भारतात निर्माण झाला नाही. गौतम बुद्धांचे प्रयत्नही अल्पप्रभावी ठरले, आणि सामाजिक समतेवर आधारित असलेल्या प्रभावी समाजव्यवस्थेऐवजी पुन्हा एक स्वतंत्र धार्मिक विचारव्यूहच निर्माण झाला.

श्री. सरदेसाई यांची पुस्तिका वाचल्यानंतर काही प्रश्न निर्माण होतात ते असे : ( १ ) भारतातील सामाजिक आणि आर्थिक पुनर्रचनेस मार्क्सची बांधिलकी हा एकच मार्ग आहे का ? ( २ ) पलायनवाद, निष्क्रियतावाद, संन्यास व देहदंडवाद, परलोकनिष्ठा आणि कर्मकांडवाद यांचे दुष्परिणाम दूर करून, व्यक्तिगत अभ्युदय आणि सामाजिक न्याय यांवर आधारित असणाऱ्या जीवनपद्धतीसाठी आवश्यक अशी विचारप्रणाली उभारण्याचे कार्य भारतीय बुद्धिवंतांना आजपर्यंत जमले नाही, याचा अर्थ त्यांची बुद्धी कमी पडते की बांधिलकी आड येते ? ( ही बांधिलकी शंकराचार्यांशी असो वा मार्क्सशी असो ! ). ( ३ ) वेदकालीन जीवन माणसाला सामाजिक ध्येयवादाची व सहकार्याची प्रेरणा देणारे होते. मध्ययुगाच्या सुमारे दोन हजार वर्षांच्या कालात सनातनी पोथिनिष्ठ परंपराशरण वृत्ती निर्माण झाली; दृढमूल झाली. तिच्या निराकरणासाठी, केवळ प्रतिक्रियात्मक लेखन व विचार यांऐवजी तरुण व बहुजनसमाज यांना विधायक सामाजिक पुनर्रचनेची दृष्टी देण्यासाठी दीर्घकालीन उपाययोजना हवी. त्या संदर्भात उच्चभ्रू बुद्धिवादाऐवजी सामाजिक करुणेचे आणि व्यावहारिक मर्मदृष्टी असणारे नेतृत्व हवे. अन्यथा बुद्धिवादी वर्गीय स्वार्थ निर्माण होऊ शकतो. कष्टकऱ्यांचे कष्ट दूर होण्याऐवजी एक वेगळीच मक्तेदारी निर्माण होऊ नये.

> " न वै राज्यं न राजाऽसीत् न च दंडो न दंडिकः ।
> धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥ "

—या भीष्माचार्यांनी केलेल्या वर्णनात राज्यसत्ताविहीन समाजव्यवस्थेचे वर्णन आढळते. त्याचा उल्लेख श्री. सरदेसाई यांनी केला आहे ( पृ. ३७ ). हा अराज्यवाद मार्क्सच्या वर्गविहीन समाजकल्पनेत जसा अभिप्रेत आहे, तसाच तो म. गांधींच्या अपरिग्रही, सत्याग्रही समाजव्यवस्थेतही अनुस्यूत आहे. वेदप्रामाण्य बाजूस ठेवले, तर आजचा भारतीय समाज कोणत्या मार्गाने जाणार ? मार्क्सच्या की म. गांधींच्या ?

अनुक्रमणिका

वस्तुतः कोणत्याही कालातला तत्त्वचिंतक आणि तत्त्वज्ञान ही त्या काळातील सामाजिक व्यवस्था आणि मानवी मूल्यकल्पना यांची फलश्रुती असते. म्हणून सार स्वीकारणे, जे कालबाह्य ते सोडून देणे आणि कालोचित त्याचा अवलंब करणे हे योग्य ठरते. भारतीय समाजाने अशा विवेकी दृष्टीतून समाजपरिवर्तनाची दिशा स्वीकारावी हे योग्य. असा विवेक जागृत करणे हे बुद्धिमंतांचे समाजकार्य म्हणता येईल. ते करताना विशिष्ट व्यक्ती किंवा मतप्रणाली यांचे एकांगी वा पक्षपाती समर्थन कदाचित वेगळ्या अंधश्रद्धेस, पोथीनिष्ठेस कारक ठरेल. भारतीय तत्त्वज्ञानातील वैचारिक आणि सामाजिक संघर्ष उकलून दाखवण्याचे महत्त्वाचे कार्य करणाऱ्या श्री. सरदेसाई यांच्यासारख्या विचारवंतासही असे समर्थन आवडेल असे वाटत नाही.

भारतीय तत्त्वचिंतनाचा जागतिक विचारप्रवाहांच्या तुलनेतून अधिकाधिक अभ्यास व्हायला हवा. पण तत्त्वज्ञानात्मक परिभाषेचा वापरही अधिक काटेकोर हवा. चिद्वाद, आदर्शवाद, चैतन्यवाद, वास्तववाद, जडवाद, गूढवाद, साक्षात्कारवाद इ. तात्त्विक संकल्पनांचे संदर्भ व अर्थच्छटांतील भेद लक्षात ठेवून लेखन व्हायला हवे. अशा शिस्तीच्या अभावी एकतर वाचकाचा गोंधळ उडतो; किंवा लेखकाच्या मनातील गोंधळ उघडा पडतो.

भारतीय तत्त्वचिंतनाची मीमांसा अनेकांनी अनेक परींनी केली आहे. श्री. सरदेसाई यांचा प्रयत्न समजून घेण्यासारखा आहे; नवीन अपेक्षा निर्माण करणारा आहे. चिंतनशील व जिज्ञासू वाचकांनी असे ग्रंथ व पुस्तिका यांचे आदरपूर्वक परिशीलन केले पाहिजे. जुन्या विचारांच्या मूर्तिपूजेऐवजी मूर्तिभंजक वाटणारे विचारच बौद्धिक मरगळ दूर करू शकतील; आणि विवेकनिष्ठ समाजप्रबोधन घडू शकेल. ती आजची गरज आहे. या संदर्भातील कार्याबद्दल श्री. सरदेसाई यांचे अभिनंदन केले पाहिजे.

**भारतीय तत्त्वज्ञान : वैचारिक आणि सामाजिक संघर्ष**

श्री. ग. सरदेसाई, लोकवाङ्मय गृह, मुंबई, १९७७,
पृष्ठे डेमी ११३, मूल्य पाच रुपये.

■

# अरुण कोलटकरांची ‘ जेजुरी ’

रमेश वा धोंगडे

अरुण कोलटकरांच्या ‘ जेजुरी ’ या इंग्रजी काव्यसंग्रहास यंदाचे ‘ राष्ट्रकुल काव्य पारितोषिक ’ मिळाल्याने त्यांचे नाव मराठी वाचकांपुढे विशेषपणे आले. पण १९५१ पासूनच कोलटकर मराठीत आणि इंग्रजीत कविता करीत होते. अलीकडेच त्यांचा ‘ कोलटकरांच्या कविता ’ हा मराठी काव्यसंग्रह आणि ‘ जेजुरी ’ हा इंग्रजी काव्य-संग्रह प्रसिद्ध झाला असला तरी या दोहोंतील कविता अलीकडच्या नव्हेत. कवी म्हणून फार थोड्या लोकांना परिचित असणारा एक मराठी माणूस इंग्रजीत स्वतंत्र काव्य-रचना करतो ( भाषांतर नव्हे; कोलटकरांनी तुकाराम, मुक्ताबाई, नामदेव व जनाबाई यांच्या अभंगांचे इंग्रजी रूपांतर यापूर्वी केलेले आहे ); आणि राष्ट्रकुलाचे पारितोषिक मिळवतो, यामुळे मराठी रसिकांना अभिमान वाटणे साहजिकच आहे; आणि ती मूळ इंग्रजी काव्यरचना वाचण्याची जिज्ञासा वाटणे अपेक्षित आहे. मात्र तसे करताना काही गोष्टी लक्षात ठेवणे जरुरीचे आहे. अनेक भारतीय लेखक–कवी इंग्रजीत वाङ्मय-निर्मिती करतात. परदेशात त्याचे कौतुक होते, ते तीन कारणांमुळे एकतर ती रचना कलाकृती म्हणून श्रेष्ठ असते. दुसरे म्हणजे त्या कलाकृतीच्या द्वारे पाश्चात्यांना पौर्वात्य संस्कृतीविषयी नावीन्ययुक्त अशी माहिती अथवा दृष्टी मिळते. तिसरे कारण असे की, ज्यांची इंग्रजी ही मातृभाषा नाही त्यांनी इंग्रजीत वाङ्मयनिर्मिती केली याचेच ते कौतुक असते; व अशा वेळी पारितोषिक हे उत्तेजनार्थ असते.

कोलटकरांच्या ‘ जेजुरी ’चा या तिन्ही दृष्टिकोनांतून विचार करावयास हवा. मात्र शेवटच्या दृष्टिकोनाबाबत प्रत्येक वाचकाने स्वतःचेच मत बनविणे जरुरीचे आहे.

‘ जेजुरी ’ मध्ये पहाटेचा एस. टी. चा प्रवास, जेजुरी-दर्शन, ते जेजुरीच्या रेल्वे स्थानकावर परतण्यासाठी गाडीची प्रतीक्षा, येथपर्यंतचा कालावधी आहे. एका दिवसाच्या या भटकंतीत कवीला आलेले अनुभव व जाणवलेल्या संवेदना यांचा एक कालक्रमबद्ध आलेख म्हणजे ‘ जेजुरी ’. येथील सर्वच कवितांत वास्तवाची एक प्रखर जाणीव आहे. ती व्यक्त करताना कवी कधी उपरोधाने बोलतो; कधी थोडासा हताश होतो; कधी अलिप्तपणे दूर राहून नुसत्या निवेदकाची भूमिका वजावण्याचा प्रयत्न करतो, अगदी क्वचित मुळापासून हलतो. ‘ द बस ’ मधील बसच्या काचेत दिसणारी

स्वतःच्या चेहऱ्याची विच्छिन्न प्रतिमा, ' द प्रीस्ट 'मधील स्वतःच्या दाढांत यात्रेकरूंना पकडून मांजराचे लबाड हास्य धारण करणारी एस. टी. बस, ' हार्ट ऑफ रुईन ' मधील मारुतीच्या डोक्यावर टेकलेले छप्पर, देवळात वास्तव्य करणारी लेकुरवाळी कुत्री, ' अ लो टेम्पल ' मधील काड्यापेटीच्या प्रकाशात दिसणारे हसरे दगड ( = मूर्ती ), त्यांच्या चेहऱ्यावरचे क्षणभरच दिसणारे भाव, ' वॉटर सप्लाय ' मधील नळाखाली उर्वरित आयुष्य घालविणारी जाळ्याची तळी, व ' द कवर्ड ' मधील वर्तमानपत्रांच्या तात्कालिक स्तंभलेखनामागून चिरयौवनाची हमी देणारे देवाचे सोन्याचे मुखवटे ही याची काही उदाहरणे.

कोलटकरांच्या काही प्रतिमा, काही तुलना लक्षणीय आहेत. मृताच्या हातावरील भाग्यरेषेप्रमाणे घटनाहीन दिसणारा रस्ता (' द प्रीस्ट '), कालाच्या ओघात अधिकाधिक घट्ट होणाऱ्या आठवणींप्रमाणे जुन्या दारावर टिकून राहिलेले रंगाचे ठसे (' द डोअर '), कारखान्यात अंगाला चिकटणाऱ्या लोखंडाच्या किसाप्रमाणे तीर्थक्षेत्राभोवती घोंगावणाऱ्या म्हाताऱ्या भिकारणी ( ' ॲन ओल्ड वूमन ' ) आणि ( खुंटीच नसल्याने कधीच ) न लागणारी वासना (' द ब्लू हॉर्स ') ही याची काही उदाहरणे.

' जेजुरी 'मधील बऱ्याचशा कवितांमध्ये निवेदनाला कलाटणी देण्याचे लघुकथेचे तंत्र वापरले आहे. ' मनोहर ' ही कविता याचे उत्तम उदाहरण. मनोहर हा देऊळ समजून एका वास्तूत जातो; पण तो असतो एक गोठा. ' म्हातारी स्त्री या तापदायक डोंगरात याचनेवाचून दुसरे काय करणार ? ' हा म्हाताऱ्या याचिकेचा ' द ओल्ड वूमन ' मधील शेवटचा प्रश्न याच धाटाचा. कोलटकरांची कविता मुक्तच्छंदात असली तरी छंदानुकारी शब्दांचे त्यांना आकर्षण आहे. ' निक ' नंतर चटकन ते ' किक ' शब्द वापरतात. ( ' द हॉर्सशू श्राईन ' ). ' हिल्झ ' या कवितेत तर ' हिल्झ ' आणि ' डेमन्झ ' या शब्दांची उलटसुलट मांडणी करण्याकडे कवीचे जास्त लक्ष आहे असे वाटते. ' बिटवीन जेजुरी ॲंड द रेल्वे स्टेशन ' या कवितेत तर शेतात खालीवर उडत नाचणाऱ्या कोंबड्यांचे वर्णन करताना कोलटकरांनी अक्षरांचीच रचना नृत्याप्रमाणे खालीवर केली आहे. हा केवळ चमत्कृतीचा हव्यास की आशयाला जोड देण्याचा केविलवाणा प्रयत्न ?

जेजुरीतील धर्मस्थाने, पुजारी, दंतकथा यांकडे पाहण्याचा कोलटकरांचा दृष्टिकोन उपहासाचा आहे. ' हार्ट ऑफ रुईन ' मधील मारुतीच्या देवळातील दैन्य दाखवताना कोलटकरांचा सूर उपरोधिक होतो. आधुनिक इंग्रजी कवितेत आणि मराठी कवितेत जाणवणारी शून्यत्वाची उदास भावना ' वॉटर सप्लाय ', ' द रेझर्वा ', ' ॲन ओल्ड वूमन ' या कवितांत दिसेल. ' यशवंतराव ' ही सर्वच कविता नर्म विनोद आणि सूक्ष्म उपरोध यांचे उत्तम उदाहरण आहे. ' द कवर्ड ' मध्ये नर्म उपहास आहे. ' अ

स्केच 'मधील अश्रद्धपणा बोचरा आहे 'अ लो टेम्पल' मधील गुरवाचे दर्शन ढोंगबाजीचा उबग आणते, तर क्वचित 'अ सॉंग फॉर अ मुरळी', 'बिट्वीन जेजुरी अँड द रेल्वे स्टेशन!' यांत दैन्यामागच्या अनीतीचे विदारक दर्शन घडते. पण एकंदर कोलटकर निवेदनात अलिप्तच राहतात. जेजुरीला जाऊनही जेजुरीत न मिसळणाऱ्या कोलटकरांची 'जेजुरी' ही म्हणूनच केवळ जेजुरी राहत नाही. ती भारतातील कोणतेही तीर्थक्षेत्र बनते.

वास्तवाचे चित्रण, स्वत्वाला न विसरण्याचा यत्न, आणि स्वतःच्या वेगळेपणाची अतिशय प्रखर जाण यांमध्ये 'जेजुरी 'तील कविता सापडल्या आहेत. कधी त्यांतून बऱ्यापैकी रचना निपजतात, तर कधी 'मकरंद', 'अ सॉंग फॉर अ वाघ्या', यांसारख्या सामान्य कविता उद्‌भवतात. आपली ही जाणतेपणाने घेतलेली त्रयस्थाची निर्लेप वृत्ती सोडून कोलटकर जेव्हा स्वतःच्या अबद्ध व्यक्तिमत्त्वाने वास्तवाला सामोरे जातात, तेव्हा मात्र 'अ प्रीस्ट्स सन' किंवा 'द बटरफ्लाय' यांसारख्या तात्त्विक उंची गाठणाऱ्या कसदार कविता ते देऊ शकतात. कोलटकरांची ही ताकद मुग्ध करणारी आहे.

■

राष्ट्रीय मुद्रण स्पर्धा सुरू झाली, त्या वेळी वेगवेगळे असे अवघे सव्वीसच विभाग होते. विभागांची ही संख्या हळूहळू वाढत गेली. आता एकूणसत्तर विभागांसाठी स्पर्धक आपले मुद्रणाचे नमुने सादर करीत असतात. त्यांत ग्रंथमुद्रणापासून पत्रशीर्षापर्यंत अनेक मुद्रण-प्रकार समाविष्ट करण्यात आले आहेत. पत्रशीर्ष-विभागातील पारितोषिक श्री. मधुकर पाटकर यांच्या आवाज प्रिंटर्सला मिळाले, तर दिवाळी अंकांसाठी ठेवलेल्या विभागामध्ये, महाराष्ट्र शासनाच्यावतीने प्रसिद्ध होत असलेले 'किशोर' मासिक आणि मुंबईतील भागवत बंधूंचे 'मौज' वार्षिक यांची निवड झाली. लाटकरांच्या कल्पना मुद्रणालयाप्रमाणे भागवतांचे मौज मुद्रणालय हे ग्रंथ आणि नियतकालिके यांच्या छपाईतील विशेष दर्जाबद्दल ख्यातनाम आहे. राज्य पातळीवर व राष्ट्रीय पातळीवर अनेक पारितोषिके मिळविणाऱ्या मौज मुद्रणालयाचा, सुबक व नीटस छपाईविषयीचा लौकिक दिवाळी वार्षिकाच्या पारितोषिकाने पुन्हा एकदा सिद्ध केला.

ग्रंथ आणि नियतकालिके यांच्या तुलनेने दैनिक वृत्तपत्रांची छपाई हा अतिशय धावपळीत व घाई-गडबडीत होणारा मुद्रण-व्यवहार. त्या गटातील या वर्षाची प्रशस्तिपत्रे पुण्यातील दैनिक सकाळ, मुंबईतील दैनिक महाराष्ट्र टाइम्स व मुंबईतीलच दैनिक लोकसत्ता या तीन वृत्तपत्रांनी मिळविली आहेत. या सन्मानप्राप्तीबद्दल या तिन्ही पत्रांचे मनापासून अभिनंदन.

अनुक्रमणिका

१५

# ‘ सशोधन-मंजिरी ’कारांची साहित्यसेवा

रामचंद्र चिंतामण ढेरे

नारायण बळवंत ऊर्फ नानासाहेब जोशी हे विजापूरचे ज्येष्ठ वाङ्मय-संशोधक नुकतेच ऐंशी वर्षांचे झाले ( जन्म १८ सप्टेंबर १८९७ ). देशसेवेसाठी महाविद्यालयीन शिक्षण मध्येच सोडून विजापूर जिल्ह्यात त्यांनी अनेकविध कार्य केले; घरचा वडिलार्जित व्यापार सांभाळला, आणि स्वातंत्र्योत्तर काळात संशोधनकार्यास स्वतःला वाहून घेतले. १९४८ मध्ये ज्ञानेश्वर पुण्यतिथीच्या मुहूर्तावर देशभक्त काकासाहेब कारखानीस यांच्या प्रोत्साहनाने त्यांनी विजापूरला ‘ ज्ञानेश्वरी वाचनमंडळ ’ सुरू केले. १९५४ मध्ये इतिहास-संशोधक श्री. ग. ह. खरे यांच्याबरोबर हस्तलिखितांच्या शोधासाठी विजापूर जिल्ह्यात ते हिंडले. त्यानंतर त्यांनी हस्तलिखितांच्या शोधाचे वेडच घेतले; आणि प्राचीन मराठी साहित्याच्या संशोधनात मोलाची भर घातली.

जुलै १९५८ च्या ‘ प्रसाद ’ मासिकात नानासाहेब जोशींचा पहिला शोध-निबंध प्रसिद्ध झाला. त्या निबंधात त्यांनी राजवाडे-ज्ञानेश्वरीच्या कालनिर्णयावर नवा प्रकाश टाकला. त्यानंतर एकाहून एक सरस शोध-निबंध त्यांनी प्रसिद्ध केले. नाथ-ज्ञानेश्वरीच्या दोन प्रती ( नवभारत, डिसेंबर १९५८ ), ‘ मुक्तेश्वर-प्रकाशावर प्रकाश ’ ( म. सा. पत्रिका, सप्टेंबर १९५९ ), श्रीएकनाथ महाराज व तिरुवेळ्ळूरचे माधवस्वामी ( नवभारत, जानेवारी १९६० ), दलपतीचे गुरू सूर्यपंडित ( म. सा. पत्रिका सप्टेंबर १९६० ), सुदेव व रुक्मिणी पत्रिका ( म. सा. पत्रिका, डिसेंबर १९६० ), शिवगीतेचा संस्कृत टीकाकार अय्याजी भट्ट ( नवभारत, जून १९६१ ), रुक्मांगद पंडित व त्यांची कविता ( इंद्रायणी, नोव्हेंबर १९६२ ), मराठीतील पहिली आरती ( इंद्रायणी, एप्रिल १९६३ ), उद्धव चिद्घनांची काही अप्रकाशित कविता ( इंद्रायणी, जुलै १९६३ ), वीरमाल सीवाजीचा ( भा. इ. सं. मं. त्रै. जून १९६६ ), एक अज्ञान कवी हरदास ( म. सा. पत्रिका जुलै १९६६ ), विजापूरचे नृसिंह मंदिर ( प्रसाद डिसेंबर १९६६ ) अशा कितीतरी महत्त्वाच्या विषयांवरील नानासाहेबांचे संशोधन जाणकारांच्या आदराचा विषय बनले आहे.

चार महत्त्वाचे ग्रंथ नानासाहेबांनी साक्षेपाने संपादिले आहेत. श्रीनिजगुणशिवयोगी-विरचित परमानुभवबोध, अ. ४, निर्गुणयोग ( वेदान्तकेसरी श्रीमल्लिकार्जुन

संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या तीन उमेदवारांची व्याख्याने घडवून आणण्याचा परिषदेने एक नवा उपक्रम योजिला होता. त्यानुसार दि. २७ व २८ रोजी प्रा. **गंगाधर गाडगीळ** आणि श्री. **पु. भा. भावे** यांची अनुक्रमे ' हरिभाऊ ी सदाशिवपेठ ' आणि ' माझ्या साहित्यविषयक कल्पना ' या विषयांवर विचारपरिप्लुत व्याख्याने झाली. दि. २९ ला ठरलेले तिसरे व्याख्यान काही अडचणीमुळे होऊ शकले नाही. त्यामुळे त्या दिवशी ' साहित्य संमेलनांचे स्वरूप ' या विषयावर एक परिसंवाद आयोजित करण्यात आला. श्री. रंगा मराठे, प्रा. न. म. जोशी, श्री. ह. मो. मराठे, डॉ. म. वि. गोखले आणि प्रा. शरद वाघ यांनी या परिसंवादात भाग घेऊन आपापले विचार मोकळेपणाने मांडले. श्री. वि. ग. कानिटकर यांनी परिसंवादाचे संचालन केले.

श्री. विजय तेंडुलकर यांच्या वादग्रस्त नाटकासंबंधी याच विषयावर डॉक्टरेटची पदवी संपादन केलेले प्रा. **चंद्रशेखर वर्वे** यांचे एक खास व्याख्यान परिषदेने घडवून आणले. २० ऑगस्टला प्रा. स. शि. भावे यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. वर्वे यांचे हे व्याख्यान झाले. श्री. तेंडुलकर यांच्यावरील आरोप कोणते, त्यांचे स्वरूप काय, त्या आरोपात तथ्य किती, इत्यादी मुद्द्यांसंबंधी व्याख्यात्यांनी सूक्ष्म व साधार विवेचन केले.

२७ ऑगस्टला वाईचे **श्री. सर्जेराव काळे** ( सायकल प्रवासी ) यांनी आपल्या भारतभ्रमण यात्रेतील काही रोमांचकारी अनुभव कथन केले.

**गप्पागोष्टी व सत्कार :** सुप्रसिद्ध लेखिका **श्रीमती वसुंधरा पटवर्धन** यांनी नुकतेच ६१ व्या वर्षात पदार्पण केले. या निमित्ताने परिषदेने १४ जून रोजी अनौपचारिक गप्पागोष्टींचा एक कार्यक्रम केला. आपली कथासृष्टी आणि भावजीवन यांविषयी वसुंधराबाईंनी वाचकांशी मनमोकळेपणाने हितगुज केले.

महाराष्ट्र शासनाने यंदा पुण्यातील ज्या लेखकांना ग्रंथपारितोषिके दिली, त्यांचा परिषदेतर्फे २९ जून रोजी प्रकट सत्कार करण्यात आला. ग्रंथलेखक आणि त्यांचे प्रकाशक यांचा हा एकत्रित सत्कारसमारंभ श्री. ग. ल. ठोकळ यांच्या अध्यक्षतेखाली सौहार्दपूर्वक साजरा झाला. या वेळी श्रीमती सरोजिनी शारंगपाणी, श्री. सतीश आळेकर, श्री. श्री. ग. माजगावकर, श्री. बा. ल. नलावडे, श्री. ह. मो. मराठे आणि प्रा. वसंत मिरासदार यांची भाषणे झाली. कार्यवाह श्री. वि. ग. कानिटकर यांनी आभार मानले.

परिषदेचे पूर्वाध्यक्ष **श्री. ना. ग.** तथा **नानासाहेब गोरे** यांची भारताचे इंग्लंड-मधील राजदूत म्हणून नियुक्ती झाल्यामुळे साहित्य-क्षेत्रात सर्वांनाच आनंद झाला. श्री. गोरे यांना शुभेच्छा व्यक्त करण्यासाठी १२ सप्टेंबरला परिषदेने गौरवाचा एक अनौपचारिक कार्यक्रम केला. कार्याध्यक्ष श्री. जं. जोशी, डॉ. वि. रा. करंदीकर,

डॉ. हेमन्त इनामदार, श्री. ग. वा. बेहेरे, श्री. पु. ए. कहूरकर इत्यादींनी या वेळी चर्चेत भाग घेतला. श्री. गोरे यांनी अमेरिकेतील वास्तव्याचे आपले अनुभव कथन केल्यावर कार्यक्रम संपला.

ज्येष्ठ कथा-कादंबरीकार श्री. **दत्त रघुनाथ कवठेकर** यांनी १८ सप्टेंबर रोजी ७६ व्या वर्षात पदार्पण केले या दिवशी श्री कवठेकर पति-पत्नींचा परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. श्री. श्री. ज. जोशी, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. वि. ग. कानिटकर इत्यादींनी विचारलेल्या प्रश्नांच्या अनुरोधाने श्री. कवठेकर यांनी आपल्या लेखनसृष्टी-तील विविध अनुभव मोकळेपणाने कथन केले. प्रा. न. म. जोशी यांनी आभार मानले.

**संमेलनाध्यक्षांचा सत्कार :** पुणे येथे भरणाऱ्या ५२ व्या संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. पु. भा. भावे यांचा प्रकट सत्कार परिषदेतर्फे १३ ऑगस्टला प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आला. श्री. बबनराव नावडीकर यांनी म्हटलेल्या महाराष्ट्रगीताने समारंभास आरंभ झाला. नंतर प्रा. द. मा. मिरासदार, श्री. व्यंकटेश माडगूळकर, श्रीमती आशा काळे, कु. कुलकर्णी, कु. अरुणा ढेरे, प्रा. न. म. जोशी, आणि नाटककार श्री. विद्याधर गोखले यांची अभ्यासपूर्ण भाषणे झाली. पुण्यातील विविध संस्था आणि व्यक्ती यांच्यामार्फत भावे यांना पुष्पहार समर्पण करण्यात आले. प्रा. ना. सी. फडके आणि श्री. गो. नी. दांडेकर यांनी श्री. भावे यांच्याकरिता मुद्दाम हार पाठविले होते. श्री. भावे यांचे कृतज्ञता व्यक्त करणारे भाषण झाल्यानंतर कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी सर्वांचे आभार मानले.

**भाषावर्ग :** परिषदेतर्फे यंदा गुजराती, सिंधी आणि मराठी या भाषांचे वर्ग सुरू करण्यात आले आहेत. या आंतरभारती भाषाशिक्षण वर्गाचे उद्घाटन २३ जुलै रोजी श्री. अतुर संगतानी यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्ष श्री. ग. दि. माडगूळकर यांनी हिंदीत भाषण करुन, महाराष्ट्रेतर छात्रांना मराठी व अन्य भाषा यांचे अन्योन्य संबंध समजावून सांगितले. प्रा. न. म. जोशी व श्रीमती कमल जोगळेकर (सिंधी), श्रीमती लीला गोळे व श्रीमती वर्षा कुलकर्णी (गुजराती), श्री. मो. रा. वाळंबे व श्री. दत्ता वाळवेकर (मराठी) हे या वर्गांना मार्गदर्शन करीत आहेत. मोडी लिपीचा वर्ग श्री. मो. रा. वाळंबे यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू आहे.

**भेटीगाठी :** बेळगावचे उदार व साहित्यप्रेमी उद्योगपती श्री. **वा. म. गोगटे** यांनी १७ ऑगस्ट रोजी सकाळी परिषदेस भेट दिली. संस्थेतर्फे त्यांचे हार्दिक स्वागत करण्यात आले. या प्रसंगी श्री. श्री. ज. जोशी, सौ. ज्योत्स्ना देवधर, डॉ. हेमन्त इनामदार, प्रा. न. म. जोशी, श्री. म. श्री. दीक्षित व श्री. शरद जोगळेकर यांच्या समवेत रावसाहेब गोगटे यांनी मनमोकळेपणाने गप्पागोष्टी केल्या व परिषदेच्या कार्याची माहिती करून घेतली. परिषदेच्या कार्यास आपली सक्रिय सहानुभूती राहील असे आश्वासन त्यांनी दिले.

**ग्रंथ-पारितोषिके :** काही उदार साहित्यप्रेमी व्यक्तींनी उत्कृष्ट ग्रंथांना पारितोषिके देण्यासाठी परिषदेला देणग्या दिलेल्या आहेत. या देणग्यांची रक्कम ठेवींत गुंतवलेली असून त्यांवरील व्याजातून ही पारितोषिके दरवर्षी दिली जाणार आहेत. पारितोषिके येणेप्रमाणे आहेत : १. कै. ह. ना. आपटे, कादंबरीसाठी, रु. १००, २. कै. गिरिजा गंगाधर जांभेकर, संपादित ग्रंथासाठी, रु. १५०, ३. कै. विश्वनाथ पार्वती गोखले, ललितेतर ग्रंथासाठी, १५०, ४. कै. अ. स. गोखले, प्रकाशित ग्रंथासाठी, रु. १००, ५. कै. ह. स. गोखले, कवितासंग्रहासाठी, रु. १००, ६. कै. शि. म. परांजपे, स्वतंत्र शैलीदार गद्यग्रंथासाठी, रु. २५०.

वरीलपैकी शेवटच्या पारितोषिकासाठी पुण्याचे श्री. नी. स. तथा अण्णासाहेब गोखले यांनी तीन हजार रुपयांची देणगी परिषदेकडे नुकतीच सुपूर्त केली आहे. या देणगीवरील व्याजातून अडीचशे रुपयांचे पारितोषिक देण्यात येणार आहे. पारितोषिकांच्या व्यवस्थापन खर्चासाठी जो अधिक खर्च येणार आहे त्याची पूर्तता श्री. जयंतराव टिळक यांनी केसरी-मराठा संस्थेतर्फे दिलेल्या पाचशे रुपयांच्या देणगीवरील व्याजातून करण्यात येणार आहे. श्री. अण्णासाहेब गोखले यांनी यापूर्वी आपल्या बंधूंच्या स्मृत्यर्थ दोन हजार रुपयांची देणगी परिषदेला दिलेली आहे. परिषद त्यांची आणि श्री. जयंतराव टिळक यांची अत्यंत ऋणी आहे.

वरील सर्व पारितोषिकांसाठी ज्यांना आपले ग्रंथ पाठवावयाचे असतील त्यांनी ते उशिरात उशिरा १५ जानेवारी १९७८ पर्यंत परिषदेकडे पाठवावेत ही विनंती. ग्रंथ १९७७ या वर्षात प्रकाशित झालेले असावेत.

**इतर देणग्या :** प्रा. गं. बा. सरदार यांनी स्वतःच्या खाजगी ग्रंथसंग्रहातील सुमारे पावणेदोनशे दुर्मिळ व महत्त्वाचे ग्रंथ परिषदेच्या ग्रंथालयास भेट म्हणून दिले. परिषदेचे कार्यवाह श्री. वि. ग. कानिटकर यांनी भिंतीवरील घड्याळासाठी दोनशे रुपयांची रक्कम देणगी म्हणून दिली. प्रा. सरदार व श्री. कानिटकर यांनी दिलेल्या देणग्यांबद्दल परिषद त्यांची आभारी आहे.

**साहित्य संमेलन :** नोव्हेंबरच्या १८, १९, २० या तारखांना पुण्यात अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे ५२ वे अधिवेशन श्री. पु. भा. भावे यांच्या अध्यक्षतेखाली भरत आहे. संमेलनाचे प्रतिनिधिशुल्क ५ रुपये भरून, परिषदेच्या कोणाही अधिकृत सभासदास संमेलनास उपस्थित राहता येईल. चारशे किमी. किंवा अधिक अंतरावरून येणाऱ्या प्रतिनिधींना रेल्वेभाड्याची सवलत मिळू शकेल. निवास-भोजनादी तीन दिवसांचा खर्च पंचेचाळीस रुपये आहे. रात्रीच्या करमणूक-कार्यक्रमांसाठी अकरा रुपये स्वतंत्र दर ठेवलेला आहे. अधिक तपशिलासाठी ‘ कार्यवाह, म. सा. संमेलन, द्वारा-पुणे नगर वाचन मंदिर, बुधवार पेठ, पुणे २ यांना लिहावे.

**मराठीच्या अध्यापकांचा मेळावा** : परिषदेच्या परीक्षा समितीचे निमंत्रक डॉ. अशोक प्रभाकर कामत यांनी अन्य सर्व समित्यांच्या सहकार्याने एक उपक्रम पार पाडला. पुण्यातील प्रशालांचे मुख्याध्यापक आणि मराठीचे अध्यापक यांचा एक मेळावा परिषदेच्या पटवर्धन सभागृहात दिनांक २८ ऑगस्टला आयोजित करण्यात आला. त्याला प्रतिसाद चांगला मिळाला.

प्रा. डॉ. प्र. ल. गावडे यांनी उपस्थित मुख्याध्यापक आणि अध्यापक यांचे स्वागत करून त्यांनी परिषदेच्या कार्यात रस घ्यावा असे आवाहन केले. डॉ. हे. वि. इनामदार यांनी पत्रिका आणि परिषद प्रकाशनांची माहिती दिली. प्रा. न. म. जोशी यांनी विविध उपक्रमांची ओळख करून दिली. श्री. मो. रा. वाळंबे आणि डॉ. अशोक कामत यांनी परिषद-परीक्षांचा नवा अभ्यासक्रम आणि एकूण परीक्षाविषयक कार्यक्रम यांची कल्पना दिली. अध्यापकांतर्फे श्री. सु. द. तांबे प्रभृतींनी काही सूचना केल्या. कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी यांनी समारोप करून सर्व उपस्थितांचे आभार मानले.

## वाङ्मयेतिहासाचे उर्वरित खंड

(अ) कै. प्रा. रा. श्री. जोग यांनी संपादिलेला 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' चार ग्रंथांच्या रूपाने म. सा. परिषदेने पुढीलप्रमाणे प्रसिद्ध केला :

(१) खंड तिसरा : इ. स. १६८० ते १८००
(२) खंड चौथा : इ. स. १८०१ ते १८७४
(३) खंड पाचवा, भाग पहिला } इ. स. १८७५ ते १९२०
(४) खंड पाचवा, भाग दुसरा }

(आ) डॉ. स. गं. मालशे यांनी संपादलेला वाङ्मयेतिहासाचा 'खंड दुसरा, इ. स. १३५० ते १६८०' असा आहे. या खंडातील सर्व लेख हाती आले असून ग्रंथाची मुद्रण-प्रत सिद्ध होत आहे.

(इ) वाङ्मयेतिहासाचा सहावा खंड (अर्वाचीन काळ) हा (१) इ. स. १९२१ ते १९४५ व (२) इ. स. १९४६ ते १९७५ अशा दोन भागांत प्रसिद्ध करण्याचे ठरले असून त्या भागांच्या संपादनकार्याची नव-योजना कार्यान्वित झाली आहे. या दोन्ही भागांच्या मुद्रण-प्रती वर्ष-दीड वर्षात सिद्ध व्हाव्यात अशी अपेक्षा आहे.

(ई) वाङ्मयेतिहासाचा पहिला खंड (प्रारंभ ते इ. स. १३५०) बरेच दिवस रेंगाळत राहिला होता. त्याच्याही संपादनाची नवी योजना आता मार्गस्थ झाली आहे. हा खंडही वर्ष-दीड वर्षात हाती येईल अशी आशा आहे.

वाङ्मयेतिहासाचा एकूणच उर्वरित प्रकल्प आता वेगाने कार्यरत झाला आहे. वाङ्मयेतिहास-समितीचे निमंत्रक डॉ. निर्मलकुमार जिनदास

अनुक्रमणिका

फडकुले आणि समितीचे अन्य सर्व सदस्य यांनी या कामात विशेष लक्ष घातले आहे.

**शाखासभा कार्य :** परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी व कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी दि. २५ सप्टेंबर १९७७ रोजी सोलापूर शाखा-सभेला भेट दिली. या निमित्ताने भरलेल्या सभासदांच्या मेळाव्यात श्रीमती यशस्विनी खाडिलकर, श्री. दत्ता हलसगीकर, श्री. रा. त्र्यं. छत्रपती, डॉ. वि. म. कुलकर्णी, डॉ. निर्मल-कुमार फडकुले, प्रा. कृ. शे. माडीकर, श्री. शं. गो. पटवर्धन, सौ. सुरेखा शहा इत्यादींनी भाग घेऊन साहित्यविषयक अनेक प्रश्नांची मनमोकळी चर्चा केली.

■

## या अंकातील लेखक

**डॉ. हे. वि. इनामदार :** ६०/१५ एरंडवणे, पुणे ४
**श्री. वि. स. वाळिंबे :** १०४७ सदाशिव पेठ, पुणे ३०
**डॉ. रा. चिं. ढेरे :** ७७ शनिवार पेठ, पुणे ३०
**डॉ. व. कृ. वऱ्हाडपांडे :** ४७३ प्राध्यापक निवास, हनुमान नगर, नागपूर ९
**डॉ. सुरेश म. डोळके :** बापूराव गल्ली, इतवारी, नागपूर २
**प्रा. रा. भि. जोशी :** २ 'झपूर्झा', साहित्यसहवास, बांद्रे पूर्व, मुंबई ५१
**प्रा. सुमेधा कुलकर्णी :** श्री. ना. दा. ठाकरसी महाविद्यालय वसतिगृह, १ ठाकरसी मार्ग, मुंबई २०
**डॉ. रा. वि. मंत्री :** 'सुमती विहार', दहिसर पश्चिम मुंबई ६८
**श्रीमती शांता गोरमले :** ललित इस्टेटस नं. ५ भंडारवाडा मार्ग, शिवाजी पार्क, मुंबई २८
**डॉ. प्र. ल. गावडे :** जुना १३७ ब, नवी पेठ, पुणे ३०
**प्रा. रवींद्र घवी :** ढेंपे कॉलेज, पणजी, गोवा
**श्री. आ. ग. माडगूळकर :** 'पंचवटी', मुंबई मार्ग, पुणे ३
**डॉ. अ. रा. केळकर :** १२३९ ए, परिमल सोसायटी आपटे रोड, पुणे ४
**डॉ. गं. ना. जोगळेकर :** प्राध्यापक निवास, विलिंग्डन कॉलेज, सांगली
**डॉ शां. भा. देव :** पुरातत्त्व विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे ६
**डॉ. ज. वा. जोशी :** ए ३ 'श्रीयश', आयुर्विमा वसाहत, २०-२१ पटर्धन बाग, पुणे ४
**डॉ. रमेश वा. धोंगडे :** गरवारे कॉमर्स कॉलेज, पुणे ४

# संमेलनाचे स्वागतशील ' कोंदण '



अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाची आजवर एक्कावन्न अधिवेशनं झाली. संमेलनाध्यक्ष म्हणून एखादे समीक्षक/संशोधक/प्राध्यापक आणि स्वागताध्यक्ष म्हणून कोणी राजकारणधुरंधर/सार्वजनिक कार्यकर्ते / उद्योगपती अशीच योजना यांपैकी बहुतेक अधिवेशनांतून झालेली/केलेली दिसून येते.

पण या वर्षी एक सुखद नवल वर्तलं आहे. संमेलनाध्यक्ष आणि स्वागताध्यक्ष हे दोघेही ललित लेखक आहेत; कथाकार हीच त्या दोघांची प्रमुख वाङ्मयीन भूमिका आहे. श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे हे अध्यक्षपदाची धुरा सांभाळणार आहेत; आणि श्री. गजानन लक्ष्मण ठोकळ यांच्याकडं स्वागताध्यक्षपदाची सूत्रं सुपूर्त करण्यात आली आहेत. नोव्हेंबर १९७७ च्या साहित्य संमेलनानं महाराष्ट्र सारस्वतातील ललित विभागाचा हा सर्वश्रेष्ठ सन्मान केला आहे. श्री. ग. ल. ऊर्फ बाबूराव ठोकळ यांची निवड ही तर मराठी ग्रंथकारांबरोबरच मराठी प्रकाशकांनाही विशेष आनंद देणारी घटना आहे.

अहमदनगर इथं १९०९ साली ठोकळ जन्मले. त्यांच्या मनावर बालपणापासूनच वाङ्मयीन संस्कार घडत गेले. त्यांच्या मातोश्री शिक्षिका असल्याने त्यांनी आपल्या बाबूला त्याच्या शालेय जीवनातच वाचनाचा नाद लावला; घरी उत्तमोत्तम पुस्तकं आणून त्याची वाचनाची हौस पुरवली. या संस्कारांची परिणती पुढं काव्यरचनेत झाली. महाविद्यालयीन अध्ययन करीत असतानाच ठोकळांचा ' सुगी ' ( १९३३ ) हा ग्रामीण कवितांचा प्रातिनिधिक संग्रह प्रसिद्ध झाला. तेव्हा ते बडोद्याला शिकत

अनुक्रमणिका

होते. तिथं प्रा. वि. पां. दांडेकर आणि प्रा. चिं. वि. जोशी हे ख्यातनाम साहित्यिक ठोकळांचे प्राध्यापक होते. याच सुमारास कविराज चंद्रशेखरांशी ठोकळांचा परिचय झाला. 'उगडं गुपित' ही दीर्घ कविता त्यांनी चंद्रशेखरांकडून 'सुगी'साठी लिहून घेतली.

'मीठभाकर' (१९३८) ह्या ठोकळांच्या ग्रामीण कविता-संग्रहानं त्यांना लोकप्रियता मिळवून दिली. त्यातील कवितांतून त्यांनी महाराष्ट्रातल्या ग्रामीण जीवनाचं वेधक आणि वास्तव दर्शन घडवलं; आणि रविकिरणमंडळानं सुरू केलेली जानपदगीतांची परंपरा विकसित केली. यानंतर आठ दहा वर्षं महाराष्ट्रात अनेक ठिकाणी त्यांच्या काव्यगायनाचे बहारदार कार्यक्रम झाले.

काव्यक्षेत्रातली लोकप्रियता संपादून ठोकळ कथालेखनाकडं वळले. 'कडूसाखर' (१९४३) हा त्यांचा कथासंग्रह फडके—खांडेकरांच्या जमान्यातही आपल्या वेगळेपणानं आणि गुणवत्तेनं उठून दिसला. वाचक त्यांच्या कथेवर खूप झाले. ग्रामजीवनातील वतनदार मराठा समाजाचं प्रत्ययकारी चित्रण त्यांनी आपल्या कथेतून केलं. ग्रामवासीयांचे जीवित-संघर्ष व त्या संघर्षामुळं व्यक्तिमनाला पडणारे पीळ यांचं हृद्य दर्शन त्यांच्या कथेतून घडतं. 'सुगंध', 'ठोकळ गोष्टी' (दोन भाग), 'मोत्यांचा चारा' व 'पहिले चुंबन' हे त्यांचे कथासंग्रह विशेष गाजले. मराठी कथेचं क्षेत्र व्यापक करण्याचं श्रेय या कथांनी ठोकळांना मिळवून दिलं.

कादंबरीकार म्हणून ठोकळांनी मिळवलेलं यशही स्पृहणीय आहे. 'गावगुंड' (१९४०) ही त्यांची कादंबरी रसिकमान्य ठरली. १९४२ च्या चळवळीतलं सातान्याकडील दहशतवादी वातावरण त्यांनी या कादंबरीसाठी निवडलं. या वातावरणाच्या पार्श्वभूमीवर तत्कालीन ग्रामजीवनातील नाट्यपूर्ण स्थित्यंतर नेमकेपणानं नोंदवीत या कादंबरीची कथावस्तू विलक्षण वेगानं पुढं सरकत जाते; वाचकांची मनं खिळवून टाकते. या कादंबरीखेरीज 'ठिणगी' ही आणखी एक कादंबरी व 'कशासाठी ? पोटासाठी !' ही नाट्यकृती ठोकळांच्या नावावर जमा आहे.

बी. ए. आणि बी. टी. या दोन पदव्या संपादून ठोकळ अध्यापन-व्यवसायात शिरले. पुण्यातल्या श्रीशिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूलमध्ये त्यांनी काही वर्षं नोकरी केली. पुढं ग्रंथविक्री (श्रीलेखन भांडार) व ग्रंथप्रकाशन (ग. ल. ठोकळ प्रकाशन) या व्यवसायांत त्यांनी प्रवेश केला. तिथेच ते स्थिरावले. प्रा. कृ. पां. कुलकर्णी आणि डॉ. वि. भि. कोलते यांसारख्या ख्यातनाम समीक्षकांचे उत्तमोत्तम ग्रंथ त्यांनी प्रकाशित केले.

पुण्यातले हे प्रसन्नतिभर व्यक्तिमत्त्व आता साहित्य संमेलनाच्या स्वागताला सिद्ध आहे !

**प्रा. सौ. अंजली अरुण सोमण**



एकोणिसावी अखिल भारतीय मुद्रण-श्रेष्ठता स्पर्धा
महाराष्ट्र साहित्य पत्रिका
श्री ज्ञानेश्वर विशेषांकास मिळालेला
प्रथम क्रमांकाचा राष्ट्रीय सन्मान
मा. राष्ट्रपतींच्या हस्ते म. सा. परिषदेच्या वतीने
स्वीकारताना कल्पना मुद्रणालयाचे

श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर

अनुक्रमणिका

